**महाराष्ट्र शासन**

**क्रमांक - सववि २००९/प्र.क्र. १००/६-स,**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ६ मे, २०११.

प्रति,

१) सचिव (प्र.सु.व र. व का. प.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मुंबई - ४०० ०३२,
३) सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
४) सर्व सह सचिव / सर्व उप सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
५) सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
६) प्रधान सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहाय्यक,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुं. ३२,
७) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग ) यांचे स्वीय सहाय्यक,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) साखर आयुक्त, साखर संकुल, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) संचालक,महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महामंडळ,लोटस हाऊस,३३ए,सर विठ्ठलदास ठाकरसी मार्ग,-मुंबई-२०.
११) संचालक (वस्त्रोद्योग),जुने सचिवालय,जी.पी.ओ. समोर,नागपूर - १.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ, पहिला मजला, वाशानी चेंबर्स, ४७, न्यू मरिन्स लाईन्स,-मुंबई
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, एम.एस.एच.सी. कॉम्प्लेक्स, उमरेड रोड, नागपूर-४४० ००९
१४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, मार्केट, यार्ड, पुणे- ४११०३७.
१५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्यादित, खेतान भवन, चर्चगेट,मुंबई-२०.
१६) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, कनमूर हाऊस, नरसी नाथा स्ट्रीट, मस्जीद, मुंबई- १.
१७) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, ५८३बी, मार्केट यार्ड, गुलटेकडी, पुणे-३७.
१८) पणन संचालक,महाराष्ट्र राज्य, पुणे, मध्यवर्ती इमारत, पुणे - ४११ ००१.
१९) संचालक रेशीम, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर, द्वारा- महाराष्ट्र राज्य हातमाग-महामंडळ, एम.एस.एच.सी. कॉम्प्लेक्स उमरेड रोड, नागपूर-४४०००९.
२०) संचालक,महाराष्ट्र गृहनिर्माण वित्तीय महामंडळ, हाऊसिंग भवन, प्लॉट नं. सी २१, ई ब्लॉक,-बांद्रा -कुर्ला कॉम्प्लेक्स, रिझर्व्ह बँकेच्या मागे, मुंबई-५१.

**विषय :-** **सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागाची नागरिकांची सनद पुस्तिका (सन २०११) प्रसिध्द करणेबाबत.**

**संदर्भ :-** **सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र.नासद-२००७/११५/ प्र.क्र.१८/०७/१८-अ, दिनांक १३.८.२००७.**

उपरोक्त विषयाबाबतची सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाची **"नागरिकांची सनद"** पुस्तिका शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक **२०११०५०६१५१८३४००१** असा आहे.

सही /-
( क.कि.पारकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन



**सत्यमेव जयते**

**महाराष्ट्र शासन**

# नागरिकांची सनद
# (प्रभावी व संवेदनशील प्रशासन)

## सन - २०११

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
## मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

## अनुक्रमणिका

**भाग (III) वस्त्रोद्योग कक्ष**



**रेशीम कक्ष**



---

# नागरिकांची सनद
## सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रास्ताविक**

महाराष्ट्र राज्यात सहकारी क्षेत्रामध्ये विविध प्रकारच्या सहकारी संस्था आहेत. उदा. सहकारी बँका, साखर कारखाने, सूत गिरण्या, प्रक्रिया संस्था, खरेदी विक्री संघ, ग्राहक संस्था, कृषि पतपुरवठा संस्था, नागरी पत संस्था, औद्योगिक संस्था, पाणीपुरवठा संस्था, मजूर संस्था, गृहनिर्माण संस्था इत्यादी. या सहकारी संस्थांना विविध प्रकारे अर्थसहाय्य देण्याच्या वेगवेगळया योजना राज्य शासनामार्फत राबविल्या जातात.या योजनांव्दारे सहकारी संस्थांना भागभांडवल,कर्ज, थकहमी व विविध प्रकारचे अनुदान दिले जाते. त्याचप्रमाणे या सहकारी संस्थां आपल्या सभासदांसाठी वेगवेगळया कामांसाठी कर्ज व अर्थसहाय्य देतात, विविध प्रकारच्या सेवा देतात, उत्पादन प्रक्रिया, विक्री इत्यादी कामे हाती घेतात. त्यामुळे सहकार व वस्त्रोद्योग विभागाच्या विविध योजनांची माहिती आणि सहकारी संस्थांमार्फत राबविल्या जाणा-या योजनांची व कामांची माहिती सर्वसामान्य जनतेला असणे आवश्यक आहे.

सहकार व वस्त्रोद्योग विभागामार्फत सहकारी संस्थांवर कायदेशीर नियंत्रण व देखरेख ठेवण्याचे काम केले जाते. तसेच या संस्थांमार्फत शासनाच्या विविध योजना राबविण्याचे काम केले जाते. या संस्थांचे आर्थिक व्यवहार तपासण्यासाठी व शासनाने दिलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग योग्य पध्दतीने होतो किंवा नाही हे पाहण्यासाठी या विभागामार्फत या संस्थांचे लेखापरिक्षण केले जाते. ही सर्व कामे करण्यासाठी सहकार व वस्त्रोद्योग विभागाचे प्रामुख्याने चार भाग करण्यात आलेले आहेत, ते (१) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्थां, (२) साखर आयुक्त, (३) कृषि पणन संचालक, आणि (४) संचालक, हातमाग, यंत्रमाग व सहकारी वस्त्रनिर्माण या चारही विभागांवर नियंत्रण ठेवण्यासाठी मंत्रालयामध्ये सचिव या दर्जाचे अधिकारी नियुक्त करण्यात आलेले आहेत.

सहकार आयुक्त यांची कार्यकक्षा संपूर्ण महाराष्ट राज्य असून त्यांच्या अधिपत्याखाली विभागीय, जिल्हा व तालुका स्तरावर कार्यालये आहेत. ही कार्यालये सर्व प्रकारच्या सहकारी संस्थांशी संबंधित कायदेशीर, प्रशासकीय व लेखापरिक्षण विषयक कामे करतात. साखर आयुक्त कार्यालयामध्ये राज्यातील सर्व साखर कारखान्यांशी संबधित कामे पाहिली जातात. या कार्यालयाच्या अधिपत्याखाली प्रादेशिक कार्यालये आहेत.

कृषि पणन संचालनालयामध्ये कृषि मालाशी निगडीत प्रक्रिया व विक्री यासंबंधीची कामे पाहिली जातात आणि हातमाग, यंत्रमाग व सहकारी वस्त्रनिर्माण संचालनालयामार्फत राज्यातील सर्व सूत गिरण्या, हातमाग व यंत्रमाग सहकारी संस्था यांचेशी संबंधित कामे हाताळली जातात. वरील चारही कार्यालयांची आस्थापनाविषयक कामे सहकार आयुक्तांमार्फत केली जातात. सहकार व वस्त्रोद्योग विभागाच्या या चारही प्रभागांकडून पुरविली जाणारी सेवा, त्यासाठी आवश्यक त्या कागदपत्रांची पूर्तता केल्यानंतर लागणारा कालावधी, सेवा पुरविणारे अधिकारी व कर्मचारी आणि विहित कालावधीत सेवा न पुरविल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल असा अधिकारी इत्यादीसंबंधीची माहिती खालीलप्रमाणे :---

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे मार्फत प्रामुख्याने खालील योजना राबविल्या जातात. या योजनामध्ये प्रामुख्याने शासकीय भाग भांडवल, कर्ज आणि अनुदान यांचा समावेश असतो :---

**(१) अल्प मुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतर :--** दुष्काळी परिस्थितीमध्ये ज्या गावांमधील पैसेवारी ५० पैशांपेक्षा कमी येते त्या गावांतील शेतक-यांच्या अल्प मुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जामध्ये रुपांतर करण्यात येते, आणि त्यांना बँकामार्फत नवीन पीक कर्जाचे वाटप करण्यात येते. यासाठी जी रक्कम आवश्यक असते त्यापैकी ६० % रक्कम शासनाच्या हमीवर नाबार्डकडून मिळते, १५% रककम जिल्हा मध्यवर्ती बँक देते,१०% रक्कम राज्य सहकारी बँक देते आणि १५% रक्कम शासनाचा सहभाग असतो.

**(२) पीक प्रोत्साहन योजना :--** सन २००६ नंतर ज्या शेतक-यांनी त्रिस्तरीय पतपुरवठा संरचनेकडून रु. २५,०००/- पर्यंत पीक कर्ज घेतले आहे, व त्याची विहित मुदतीत परतफेड केलेली आहे. अशा शेतक-यांना ४% व्याज अनुदान तसेच २५००१ ते

३.०० लाखापर्यंत पीक कर्जाची उचल करुन व्याजासह मुदतीत परतफेड करणा-या शेतक-यांना २ % व्याजात सूट देण्यात येते.या योजनेला डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना असेही म्हणतात. या योजनेची व्याप्ती शासन निर्णय दिनांक २८.६.२०१० अन्वये वाढविण्यात आली आहे. या सुधारित योजनेनुसार यापुढे रु. ५०,००० पर्यंतचे अल्पमुदत पीक कर्ज उचल करुन विहित मुदतीत परतफेड करणा-या शेतक-यांना ४% व्याज अनुदान व त्यापुढील रु. ३ लाख पर्यंतचे कर्जाच्या परतफेडीसाठी २% व्याज अनुदान देण्यात येणार आहे.

**(३) व्याज सवलत :-** शेतक-यांना अधिकतम ६% व्याजाचे दराने अल्पमुदत पीक कर्ज उपलब्ध व्हावे म्हणून शासनाने १ % व्याज सवलतीची योजना लागू केली आहे. रुपये ३ लाखापर्यंतच्या अल्प मुदत पीक कर्जासाठी ही व्याज सवलत बँकांना देण्यात येते.

**(४) औद्योगिक सहकारी संस्थांना अर्थसहाय्य :--** औद्योगिक सहकारी संस्थांना १:३ या प्रमाणात भाग-भांडवल देण्यात येते.

**(५) मजूर सहकारी संस्थांना अर्थसहाय्य :--** या संस्थांना शासकीय भागभांडवल दिले जाते. त्याचप्रमाणे या संस्थांना रुपये १५.०० लाखापर्यंतची कंत्राटी कामे बिना निविदा देण्यात येतात.या संस्थांच्या नोंदणीसाठी आता ५० ऐवजी २५ सभासदांची आवश्यकता असते.

**(६) सहकारी उपसा जलसिंचन योजनांना अर्थसहाय्य :--** एकूण प्रकल्प खर्चाच्या २५% किंवा रु. १०० लाख यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढे शासकीय अनुदान देण्यात येते.

**३.**

**सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.**

| अनु-क्रमांक | विभागाकडून/कार्यालयाकडून पुंरविली जाणारी सेवा | आवश्यक कागदपत्रांची पूर्तता केल्यानंतर किती कालावधीत सेवा पुरविली जाईल | सेवा पुरविणारा अधिकारी/ कर्मचारी | विहित कालावधीत सेवा न पुरविल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल तो अधिकारी व दूरध्वनी क्रमांक |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| | **राज्यस्तर** | | | |
| १ | जनतेकडून आलेल्या तक्रारींना अंतरिम उत्तर देणे. | ७ दिवस | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| २ | जनतेकडून आलेल्या तक्रारींना अंतिम उत्तर देणे. | ४५ दिवस | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| ३ | राज्यस्तरीय सहकारी संस्थांची नोंदणी. | २ महिने | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| ४ | राज्यस्तरीय सहकारी संस्थांची पोट-नियम दुरुस्ती. | २ महिने | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| ५ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० चे कलम ७३(ग).खाली न मोडणा-या राज्यस्तरीय सहकारी संस्थेसंबंधीच्या कलम १५२ अ नुसार दाखल झालेल्या अर्जावरिल अपिलाचा निर्णय. | १० दिवस | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| ६ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६१ अन्वये निबंधकाच्या कार्यालयातील कागदपत्रांची पाहणी करणे. | १ दिवस | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| ७ | वर नमूद केलेल्या नियमान्वये निबंधकाच्या कार्यालयातील कागदपत्रांची साक्षांकित प्रत उपलब्ध करुन देणे. | फी भरल्यानंतर २ दिवस | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| ८ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे कलम ७६ अन्वये संस्थेने विशेष साधारण सभा न बोलाविल्यास अशी सभा बोलाविणे. | १ महिना | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| ९ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे कलम ७३ आयजी नुसार अविश्वास ठराव पारित करण्यासाठी संचालक मंडळ सभाबोलाविणे. | परिपूर्ण प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर / ७ दिवस | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| १० | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे कलम ८३ नुसार संस्थेची चौकशी करण्याबाबतच्या मागणी अर्जावर कार्यवाही. | ७ दिवस | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| ११ | राज्यस्तरीय सहकारी संस्थेमध्ये सदस्यत्व देण्यास नकार देण्याच्या संस्थेच्या निर्णयाविरुध्द दाखल करण्यात आलेल्या अपिलाचा निर्णय. | परिपूर्ण प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर / ७दिवस | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| १२ | सहकारी संस्थांना द्यावयाच्या शासकीय अर्थसहाय्याच्या प्रकरणावर निर्णय घेणे. | १ वर्ष | सहकार आयुक्त | सचिव (सहकार) |
| | **विभागीय स्तर** | | | |
| १ | जनतेकडून आलेल्या तक्रारींचा निवारणासंबंधी अंतरिम उत्तर देणे. | ७ दिवस | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे |
| २ | जनतेकडून आलेल्या तक्रारींना अंतिम उत्तर देणे. | ४५ दिवस | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे |
| ३ | विभागस्तरीय सहकारी संस्थांची नोंदणी. | २ महिने | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे |
| ४ | सहकारी संस्थांची पोट-नियम दुरुस्ती. | २ महिने | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे |
| ५ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० चे कलम १५२ व १५४ खाली अपिले/पुर्नर्निरक्षण अर्जावर निर्णय. | नैसर्गिक न्याय तत्वास अनुसरुन लागणारा कमीत कमी कालावधी | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे |

| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
|---|---|---|---|---|
| ६ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे कलम १५२ अनुसार नामनिर्देशन पत्रावर दाखल झालेल्या अर्जावरिल अपिलाचा निर्णय | १० दिवस | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे. |
| ७ | जिल्हा देखरेख सहकारी संस्था अंतर्गत संवर्गीकृत गट सचिवांच्याअपिल अर्जावर निर्णय. संवर्गीकृत गटसचिवांची यंत्रणा सहकार कायद्यातील बदलानुसार आता संपुष्टात आली आहे | नैसर्गिक न्याय तत्वास अनुसरुन लागणारा कमीत कमी कालावधी | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे. |
| ८ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६१चे नियम क्र.३० अन्वये निबंधकाच्या कार्यालयातील कागदपत्रांची पाहणी करणे. | १ दिवस | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे. |
| ९ | महाराष्ट्र सहकारी संस्थाअधिनियम,१९६१चे नियम निबंधकाच्या कार्यालयातील कागदपत्रांची साक्षांकित प्रत उपलब्ध करुन देणे. | फी भरल्यानंतर २ दिवसात | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे. |
| १० | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे नियम क्र.७६अन्वये संस्थेने विशेष साधारण सभा न बोलाविल्यासअशी सभा अशी बोलाविण्याबाबतची कार्यवाही. | १ महिना | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे. |
| ११ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे कलम ७३ आयजी नुसार अविश्वास ठराव पारित करण्यासाठी संचालक मंडळ सभा बोलाविणे. | परिपूर्ण प्रस्ताव झाल्यानंतर ७ दिवस | विभागीय सहनिबंधक | ------- |
| १२ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे कलम ८३ नुसार संस्थेची चौकशी करण्याबाबतच्या मागणी अर्जावर कार्यवाही. | ७ दिवस | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे. |
| १३ | सहकारी संस्थांमध्ये सदस्य म्हणून नकार देण्याच्या अर्जावर अपिल दाखल झाल्यास त्याचा निर्णय देणे. | ३ महिने | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे. |
| १४ | सहकारी संस्थांमध्ये द्यावयाच्या शासकीय अर्थसहाय्याच्या प्रकरणावर निर्णय घेणे. | ३ महिने | विभागीय सहनिबंधक | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे. |

**जिल्हास्तर**

| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
|---|---|---|---|---|
| १ | जनतेकडून आलेल्या तक्रारींच्या निवारणासंबंधी. अंतरिम उत्तर देणे | ७ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| २ | जनतेकडून आलेल्या तक्रारींना अंतिम उत्तर देणे. | ४५ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| ३ | जिल्हास्तरीय सहकारी संस्थांची नोंदणी. | २ महिने | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| ४ | सहकारी संस्थांची पोट-नियम दुरुस्ती. | २ महिने | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| ५ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० चे कलम १५२ व नामनिर्देशन पत्रावर दाखल झालेल्या अर्जावरिल अपिलाचा निर्णय | १० दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| ६ | मुंबई सावकारी नियंत्रण कायदा,१९४६ नुसार सावकारी परवाने देणे.---- | | | |
| | (अ) सहाय्यक निबंधक कार्यालयाकडून शिफारस करुन आलेले अर्ज. | ७ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| | (ब ) सहाय्यक निबंधक कार्यालयाकडून सावकारांचे नूतनीकरणांचे आलेले अर्ज. | ७ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| ७ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६१चे नियम क्र.३० अन्वये निबंधक कार्यालयातील कागदपत्रांची पाहणी करणे. | १ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| ८ | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६१चे नियम क्र.३० अन्वये निबंधक कार्यालयातील कागदपत्रांची साक्षांकित प्रत उपलब्ध करुन देणे. | १ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० चे कलम ७३ आयजी नुसार अविश्वास ठराव पारित करण्यासाठी संचालक मंडळ सभा बोलाविणे. | परिपूर्ण प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर ७ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| १० महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० चे कलम ७३ आय संस्थेची चौकशी करणेबाबतच्या मागणी अर्जावर कार्यवाही. | परिपूर्ण प्रस्ताव झाल्यानंतर ७ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| ११ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० चे कलम ८३ नुसार संस्थेची चौकशी करणेबाबतच्या मागणी अर्जावर कार्यवाही. | ७ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| १२ सहकारी संस्थांमध्ये सदस्य म्हणून नकार देण्याच्या अर्जावर अपिल दाखल झाल्यास त्याचा निर्णय देणे. | ३ महिने | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| १३ महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ कायदा अंतर्गत | ७ दिवस | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |
| १४ सहकारी संस्थांना द्यावयाच्या शासकीय अर्थसहाय्याच्या प्रकरणांवर निर्णय घेणे. | १ वर्ष | जिल्हा उप निबंधक | विभागीय सहनिबंधक |

**तालुका स्तर**

| | | | |
|---|---|---|---|
| १ जनतेकडून आलेल्या तक्रारींच्या निवारणासंबंधी अंतरिम उत्तर देणे. | ७ दिवस | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| २ जनतेकडून आलेल्या तक्रारींना अंतिम उत्तर देणे. | ४५ दिवस | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| ३ तालुकास्तरीय सहकारी संस्थांची नोंदणी. | २ महिने | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| ४ सहकारी संस्थांची पोट-नियम दुरुस्ती. | २ महिने | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| ५ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० चे कलम १५२ अनुसार नामनिर्देशन पत्रावर दाखल झालेल्या अर्जावरिल अपिलाचा निर्णय. | १० दिवस | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| ६ मुंबई सावकारी नियंत्रण कायदा,१९४६ नुसार सावकारी परवाने देणे.---- | | | |
| (अ) अपिल अर्ज शिफारस करुन जि.उ.नि.यांचेकडे पाठविणे | ७ दिवस | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| (ब ) सावकारांचे नुतनीकरणांचे आलेले अर्ज शिफारस करुन जि.उ.नि. यांचेकडे पाठविणे. | ७ दिवस | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| ७ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६१चे नियम क्र.३० अन्वये निबंधक कार्यालयातील कागदपत्रांची पाहणी करणे. | १ दिवस | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| ८ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६१चे नियम क्र.३० अन्वये निबंधक कार्यालयातील कागदपत्रांची साक्षांकित प्रत उपलब्ध करुन देणे. | फी भरल्यानंतर २ दिवसांत | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| ९ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे कलम ७६ अन्वये संस्थेने विशेष साधारण सभा न बोलाविल्यास अशी सभा बोलाविण्याबाबतची कार्यवाही. | १ महिना | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| १० महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे कलम ७३ आयजी नुसार अविश्वास ठराव पारित करण्यासाठी संचालक मंडळ सभा बोलाविणे. | परिपूर्ण प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर ७ दिवस | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| ११ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६०चे कलम ८३ नुसार संस्थेची चौकशी करणेबाबतच्या मागणी अर्जावर कार्यवाही. | ७ दिवस | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| १२ सहकारी संस्थांमध्ये सदस्य म्हणून नकार देण्याच्या अर्जावर अपिल अपील दाखल झाल्यास त्याचा निर्णय देणे. | ३ महिने | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |
| १३ गुळ/खंडसरी वरील गु-हाळांना परवाना देणे. | ७ दिवस | सहाय्यक निबंधक | जिल्हा उप निबंधक |

## नागरिकांनी सहकारी संस्थेची नोंदणी करण्यासाठी करावयाच्या अर्जाचा नमुना व वेगवेगळया सहकारी संस्थांची नोंदणी करण्यासाठी द्यावी लागणा-या कागदपत्रांची यादी.

### १. नियोजित संस्थेच्या नावास मान्यता व बँकेत खाते उघडण्याकरिता करावयाच्या अर्जाचा नमुना

**विषय :** नियोजित --------------------- सहकारी संस्था मर्यादित --------------------- ता. ------------------------- जि. -------------------- या संस्थेच्या नावे जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेत खाते उघडण्यास परवानगी मिळणेबाबत.

महोदय,

वरिल विषयास अनुसरून आपणास सादर करतो की, आम्ही नियो.------------------- सहकारी संस्था. मर्या. ------------- ता. --------- जि. ------------ या नावाची संस्था नोदणी करुन घेण्यासंदर्भात सदर नियो. संस्थेची पहिली प्राथमिक सभा, वार--------- दि. --------------- रोजी घेण्यात आली असून सदर सभेस एकूण --------------- प्राथमिक सदस्य हजर होते.

तरी नियो.-------------- सहकारी संस्था मर्या.------------ ता. ----------- जि. -------- या संस्थेच्या नावे ------------- जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या. शाखा ------------- ता. ------------- जि. --------------- या शाखेत बचत खाते उघडण्यास परवानगी देण्यात यावी अशी विनंती आहे.

या सोबत नियो. संस्थेच्या प्राथमिक प्रवर्तक/सभासदांचे सभेच्या इतिवृत्तांची प्रत प्राथमिक सभासदांची प्रवेश शुल्क (फी), भाग (शेअर्स) धारण केलेबाबतची यादी, तीन वर्षाच्या संभाव्य योजना, गावची लोकसंख्या, त्याप्रमाणे मुख्य प्रवर्तक इतर प्रवर्तक, विभक्त कुटुंबातील असलेबाबतच गाव कामगार, तलाठी यांचा दाखला व इतर आवश्यक कागदपत्रे सोबत जोडली आहेत. तरी वर नमूद केल्याप्रमाणे प्रस्तुत नियोजित संस्थेच्या नावे बँकेत खाते उघडण्यास परवानगी द्यावी, ही विनंती मे. जाहीर व्हावे.

आपला विश्वासु,

मुख्य प्रवर्तक,
नियोजित सहकारी संस्था मर्या.,
ता.--------- जि.----------

**या अर्जासोबत जोडावयाची कागदपत्रांची यादी ----**

१. नियोजित संस्थेच्या प्राथमिक प्रवर्तक सभासदांच्या सभेच्या इतिवृत्ताची प्रत.
२. प्राथमिक सभासदांच्या प्रवेश शुल्काची (फी ) यादी.
३. भाग (शेअर्स) धारण केलेबाबतची आकडेवारीसह यादी.
४. तीन वर्षाच्या संभाव्य योजना.
५. गावची लोकसंख्या किती याबाबतचा आवश्यक तो दाखला.
६. मुख्य प्रवर्तक व इतर प्रवर्तक, विभक्त कुटुंबातील असलेबाबत गाव कामगार तलाठी यांचा दाखला.
७. इतर आवश्यक कागदपत्रे.

**(ही परवानगी देण्याचा कालावधी २ महिने.)**

### २. संस्था नोंदणीसाठी करावयाच्या अर्जाचा नमुना

**नमुना क्र. अ नियम ५ (१)**

सहकारी संस्थांचे अपर / उप / सहायक / निबंधक -------------------------- यांस आम्ही, पुढील संस्थेची नोंदणी करण्या संदर्भात प्रस्ताव त्यासोबत जोडलेल्या पुढील कागपत्रांसह सादर करीत आहोत.

२. आम्ही असेही घोषित करतो की, यासोबत दिलेली माहिती व कागदपत्रांतील माहिती ही आमच्या माहितीप्रमाणे पूर्ण बरोबर आहे.

**७.**

१. नियोजित संस्थेचे नाव : ---
२. नोदंणी करावयाचा पत्ता. ---
३. जवाबदारी मर्यादित किंवा अमर्यादित : ---
४. कार्यक्षेत्र : ---
५. संस्थेची उद्दीष्टे. : ---
६. अर्जाच्या तारखेपर्यंत प्रवर्तकांनी केलेल्या प्रारंभिक खर्चाची रक्कम : ---
आणि संस्थेची नोंदणी करुन घेण्यासाइी त्यांचेकडून जो खर्च केला : ---
जाण्याचा संभव आहे असा खर्चाचा अंदाज.
७. संसथेंची पुस्तके व हिशेब ज्या भाषेत ठेवण्यात येतील ती भाषा. : ---

**टिपा :** (१) लागू नसलेला मजकूर खोडावा.
(२) संस्थेच्या नावात कोणत्याही जातीचा किंवा धार्मिक संप्रदायाचा कोणताही उल्लेख नसावा.
(३) आम्ही (१० पेक्षा कमी नसतील इतक्या) अर्जदारांनी सह्या केलेल्या नियोजित उपविधीच्या ४ प्रती पाठवित आहोत.

| अ.क्र. (१) | संपूर्ण नाव (२) | व्यक्ती किंवा एक व्यक्तिभूत संस्था (३) | वय (४) | राष्ट्रीयत्व (५) | व्यवसाय (६) |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुख्य प्रवर्तक | | | | |
| २ | | | | | |
| ३ | | | | | |
| ४ | | | | | |
| ५ | | | | | |
| ६ | | | | | |
| ७ | | | | | |
| ८ | | | | | |
| ९ | | | | | |
| १० | | | | | |

| राहण्याचे ठिकाण (७) | भाग (शेअर्स) भांडवलासाठी दिलेली रक्कम (८) | अर्जावर सही करणा-यापैकी इतर कोणताही इसम त्याच्या कुटुंबातील इसम आहे किवा कसे (९) | संस्थेच्या प्रतिनिधीच्या बाबतीत तो त्या संस्थेच्या समितीचा सदस्य आहे किवा कसे (१०) |
|---|---|---|---|
| नोंदणीसंबंधीचा किंवा इतर पत्रव्यवहार ज्याच्या पत्त्यावर करावयाच्या त्या इसमाचे नाव व पत्ता. | | | |
| १ मुख्य प्रवर्तक | | | |
| २ | | | |
| ३ | | | |
| ४ | | | |
| ५ | | | |
| ६ | | | |
| ७ | | | |
| ८ | | | |
| ९ | | | |
| १० | | | |

## नोंदणी शुल्काचे (फी) दर

**१. वेगवेगळया सहकारी संस्थांसाठी नोदणी शुल्क भरण्याबाबतचे सुधरीत दार निर्गमित केले असून ते खालीलप्रमाणे :---**

| | | | |
|---|---|---|---|
| (एक ) | कृषि संस्था | (अ) पणन संस्था<br>(ब ) इतर कृषि संस्था | १,२५०<br>१५० |
| (दोन ) | पीक संरक्षण संस्था | | २५० |
| (तीन ) | उपसा सिंचन संस्था | | २५० |
| (चार ) | ग्राहक संस्था | (अ) अल्पोपहार गृह<br>(ब ) प्राथमिक ग्राहक भंडारे :-- (एक) ग्रामीण क्षेत्रातील<br>(दोन) नागरी क्षेत्रातील<br>(क ) घाऊक ग्राहक भंडारे<br>(ड ) विविध वस्तू ग्राहक भंडारे | ५००<br>१५०<br>२५०<br>२,५००<br>१,६०० |
| (पाच ) | सहकारी बँका | (अ) मध्यवर्ती बँक<br>(ब ) अन्य बँका (पगारदार सेवकांच्या सहकारी संस्था वगळून)<br>(क) पगारदार सेवकांच्या सहकारी संस्था | ५,०००<br>२,५००<br>५०० |
| (सहा ) | शेती संस्था | (अ) सामूहीक शेती संस्था<br>(ब ) संयुक्त शेती संस्था<br>(क) दुग्धव्यवसाय संस्था | १५०<br>१५०<br>१५० |
| (सात ) | गृहनिर्माण संस्था | (अ) भाडेकरु मालकी हक्क गृहनिर्माण संस्था<br>(ब ) भाडेकरुसह - भागीदार गृहनिर्माण संस्था<br>(क) १}इतर गृहनिर्माण सहकारी संस्था<br>२}मागासवर्गीयांच्या गृहनिर्माण सहकारी संस्था<br>(ड) लोकआवास योजनेअंतर्गत सहकारी गृहनिर्माण संस्था | २,५००<br>२,५००<br>२,५००<br>५०<br>५० |
| (आठ) | प्रक्रिया संस्था | (अ) कृषि प्रक्रिया संस्था (साखर कारखाने व सूतगिरण्या वगळून)<br>(ब) औद्यागिक प्रक्रिया संस्था. | १,२५०<br>५०० |
| (नऊ) | सहकारी साखर कारखाने | | २५,००० |
| (दहा) | सहकारी सूत गिरण्या | | १५,००० |
| (अकरा) | उत्पादकांच्या संस्था | औद्योगिक उत्पादकांचे संस्था | १५० |
| (बारा) | साधन संस्था | (अ) पतपुरवठा (क्रेडिट रिसोर्स) संस्था :--<br>(एक) कृषिविषयक<br>(दोन) नागरी पत संस्था<br>(ब) पत पुरवठा न करणा-या (नॉन क्रेडिट रिसोर्स सोसायटीज)<br>(क) सेवा पुरवठा (सर्व्हिस संस्था) | <br>१५०<br>२५०<br>१५०<br>१५० |
| (तेरा) | सर्वसाधारण संस्था | (अ) सामाजिक<br>(ब) व्यापारी | २५०<br>१,२५० |
| (चौदा) | वरील कोणत्याही नोंदी खाली न येणा-यासंस्था | | ५०० |

मुख्य नियमांच्या नियम ८६ च्या पोट-नियम (१) मधील नोंदी (एक) (दोन) आणि (तीन) या ऐवजी पुढील नोंदी दाखल करण्यात येतील :

| | | (रुपयांत) |
|---|---|---|
| (एक) सामान्य आर्थिक दावे | (अ) दाव्यातील हक्क मागणीची रक्कम रु.५,०००/- पेक्षा अधिक नसेल तेव्हा,<br>(ब) अशी रक्कम जेव्हा, रु. ५,०००/- पेक्षा अधिक परंतु रु.१,००,०००/- पेक्षा अधिक नसेल तेव्हां,<br>(क) अशी रक्कम जेव्हा, रु. १,००,०००/- पेक्षा अधिक असेल तेव्हां, | १००/-<br>रु.१,०००/- च्या कमाल मर्यादेस अधीन राहून दाव्यातील हक्क मागणी केलेल्या रकमेच्या १ टक्का<br>रु.१०,०००/- च्या कमाल मर्यादेस अधीन राहून दाव्यातील हक्क मागण्यांची रक्कम अर्धा टक्का |
| (दोन) गुंतागुंतीचे अधिक दावे | (अ) वाद दाव्यातील हक्क मागणीची रक्कम रु.५,०००/- पेक्षा अधिक नसेल तेव्हा,<br>(ब) अशी रक्कम जेव्हा, रु. ५,०००/- पेक्षा अधिक परंतु रु. १,००,०००/- पेक्षा अधिक नसेल तेव्हां,<br>(क)अशी रक्कम जेव्हा, रु. १,००,०००/- पेक्षा अधिक असेल तेव्हां, | २००/-<br>रु.२,०००/- च्या कमाल मर्यादेस अधीन राहून किमान रु. २००/- अधिक दाव्यातील हक्क मागणीच्या रकमेच्या दोन टक्के.<br>रु.१५,०००/- च्या कमाल मर्यादेस अधीन राहून किमान रु. २०००/- अधिक दाव्यातील हक्क मागणीच्या रकमेच्या १ टक्का |
| (तीन) इतर दावे | कलम २३, ३५, ९७, १४९, १५०, १५२व १५४ अंतर्गत अर्ज अपिल, पुनरिक्षण अर्ज इत्यादी. | रु. १००/- |
| (चार) | कलम १०१ अंतर्गत वसुली दावे | वरिल अनुक्रमांक १ व २ प्रमाणे. |
| (पाच) | वरिल अनुक्रमांक ३ मधील अर्जाचा प्रक्रिया खर्च | प्रति दावेदार रु. ५०/- प्रमाणे. |
| (सहा) | कलम ९ अंतर्गत वाद (मनी क्लेम वगळून) | रु. १,०००/- |

**४.तसेच वेगवेगळया प्रकारच्या संस्था नोंदणीसाठी नोदणी अर्जासोबत असणा-या कागदपत्रांची चेकलिस्ट खलीलप्रमाणे --**

(अ) गृहनिर्माण सहकारी संस्था एकूण ३ प्रकारच्या चेकलिस्ट सोबत जोडली आहे. (परिशिष्ट -एक)

(ब) नागरी सहकारी पतसंस्था नोंदणी अर्जासोबत जोडावयाच्या कागदपत्रांची चेकलिस्ट

१. कोर्ट फी स्टॅम्प.
२. पहिल्या सभेचे इतिवृत्त.
३. सभासदांची यादी.
४. पोट-नियमांच्या ४ प्रती.
५. बँकेत नियोजित संस्थेच्या नावे जमा रकमेचा बँकेचा दाखला.
६. नियोजित संस्थेचे कामकाज आर्थिकदृष्ट्या सक्षम कसे होणार आहे याबद्दलची संस्थेच्या कामाची योजना.
७. संस्थेला जागा उपलब्ध असले बाबतचा पुरावा.
८. सभासद संख्या खालीलप्रमाणे :---

| नागरी विभागाचा प्रकार | प्राथमिक सदस्य संख्या | भागभांडवल रुपयात |
|---|---|---|
| १. बृहनमुंबई (जिल्हा)<br>पुणे जिल्हा<br>नागपूर जिल्हा<br>बृहनमुंबई (वार्ड / प्रभाग) | ४,०००<br>४०००<br>४०००<br>३००० | ७५ लाख<br>५० लाख<br>५० लाख<br>५० लाख |
| २. महानगर पालिका असलेली शहरे (वार्ड / प्रभाग) | २,५०० | २० लाख |
| ३. नगरपालिका असलेली शहरे | २,००० | १० लाख |
| ४. अन्य नागरी व अधि. नागरी / ग्रामीण (एक गाव) | १,००० | ४ लाख |
| ५. दुर्बल घटकांसाठी (एक वॉर्ड / एक गाव / एक प्रभाग) | १,००० | २ लाख |
| ६. तालुका | २,५०० | ५ लाख |
| ७. जिल्हा | ५,००० | २० लाख |

९. सक्षम अधिका-यांचा लोकसंख्येचा दाखला.
१०. नियोजित संस्थेचे सभासद कार्यक्षेत्रातील असलेबाबतचा दाखला.
११. संस्थेची संभाव्य योजना.
१२. बँक बँलन्स प्रमाणपत्र.
१३. नोंदणी शुल्क भरलेबाबतचे चलन इत्यादी.

**५. नागरी बँका नोदणीसाठी रिझर्व्ह बँकेची पूर्वपरवानगी मिळावी म्हणून प्रस्तावासाठी पाठवावयाची कागदपत्रे :--**

१. भारतीय रिझर्व्ह बँकेचे दिनांक ३० ऑगस्ट २००० च्या परिपत्रकानुसार देण्यात आलेला तक्ता.
२. प्रकल्प अहवालाची विहित नमुन्यात माहिती.
३. नियोजित बँकेचे नाव.
४. प्रस्तावित बँकेच्या कार्यक्षेत्राचा दर्जा.
५. कार्यक्षेत्रातील लोकसंख्या.
६. व्यवसायनिहाय लोकसंख्या विगतवारीबाबत तपशिलवार माहिती.
७. कार्यक्षेत्रातील व्यापारी बँका/ग्रामीण बँका/नागरी सहकारी बँका व इतर सहकारी बँकांची विहित नमुन्यात माहिती.
८. कार्यक्षेत्रात कार्यरत असलेल्या शेती/व्यापारी उत्पादनांशी निगडीत व्यवसायाची माहिती.
९. बँकिंग व्यवसायातील खेळते भांडवलाची माहिती.
१०. प्राधान्यक्रम असलेल्या क्षेत्रातील व्यवसायाची माहिती.
११. नियोजित बँक तेथील लोकसंख्येनुसार लोकांच्या आर्थिक गरजा कशा पूर्ण करणार आहेत याची माहिती.
१२. नियोजित बँकेने पुढील ३ वर्षाची भाग भांडवल राखील निधी, ठेवा व कर्ज याची अंदाजे नियोजनाची माहिती.
१३. पुढील ३ वर्षात होणारा नफा / तोटा कारणासह प्रस्तावित माहिती.
१४. कार्यक्षेत्रात भविष्यात व्यवसायवाढीच्या दृष्टीने संभाव्य परिस्थिती, नवीन प्रकल्प, उभारणीबाबत माहिती.
१५. प्रवर्तक सभासदांची वैयक्तिक विहित नमुन्यात माहिती.
१६. प्रवर्तकामध्ये बँकिंग अनुभव असलेल्या कमीतकमी २ व्यक्तींचा समावेश.
१७. प्रवर्तक कार्यक्षेत्रातील वित्तीय संस्था, बँका, सहकारी बँका, संस्था यांचा थकबाकीदार नसलेबाबत माहिती.
१८. सर्व प्रवर्तकाचे चारित्र्य पडताळणी / फौजदारी गुन्हा नसलेबाबतचा सक्षम अधिका-यांचे दाखले.
१९. प्रवर्तक चीफ फंड / एल. बी.एफ.सी./ सहकारी बँकामध्ये संचालक म्हणून सहभागी नसलेबाबत माहिती.
२०. पोट - नियमांची प्रत.
२१. लोकसंख्येचा दाखला.
२२. प्रवर्तकामध्ये २ महिला / मागासवर्गीय / दुर्बल घटक असलेबाबत माहिती.
२३. प्रवर्तक विभक्त कुटुंबातील असलेबाबत दाखला.

**६. औद्योगिक सहकारी संस्थांसाठी नोंदणी अर्जासोबत जोडावयाची कागदपत्रे (चेकलिस्ट) :--**

१. किमान ५१ कारागीर सभासद, (९० टक्के सभासद कारागीर असले पाहिजेत.)
२. कोर्ट फी स्टँम्प.
३. सभासदाचे नांव, पत्ता, व व्यवसायाबाबत माहिती.
४. सभासद विभक्त कुटुंबात असलेबाबत दाखला.
५. सभासद समान उद्योग असलेल्या दुस-या औद्योगिक संस्थेचा सभासद नसलेबाबत दाखला.
६. संस्थेचा प्रकल्प अहवाल.
७. नोदणी फी भरलेबाबत चलन.
८. पुढील ३ वर्षाची संभाव्य योजना व आर्थीक पत्रके.
९. संस्था शासकीय मदतीशिवाय अर्थक्षम होऊ शकेल याबाबत मुख्य प्रवर्तकांचा दाखला.
१०. पहिल्या सभेचे इतिवृत्त.
११. बँक बँलन्स सर्टिफिकेट.

**७. पगारदार नोकरांची पतसंस्था नोदंणीसाठी जोडवयाच्या कागदपत्रांची (चेकलिस्ट) :--**

१. राज्य शासकीय नोकरांची आणि जिल्हा परिषदेच्या तृतीय / चतुर्थ कर्मचा-यांची नगरपालिका, विद्यापीठ कर्मचारी व तत्सम पतपेढीकरिता कमीतकमी १०० प्रवर्तक सभासद असणे आवश्यक आहे.

२. प्राथमिक भाग भांडवल रु. १०,०००/- व पुढील रु. १,००,०००/- भाग भांडवलात वाढ होईल याची माहिती.

३. पहिल्या सभेचे इतिवृत्त.

४. बँक बँलन्स सर्टिफिकेट.

५. कोर्ट फी स्टँम्प.

६. पोट - नियमांच्या ४ प्रती.

राज्यातील नागरी/ग्रामीण बिगरशेती सहकारी पतसंस्थांच्या नोदणी कार्यक्षेत्र वाढ व शाखा विस्तार यांस दि.९.८.२००८ पासून पुढील ५ वर्षे दि. ८.११.२०१० च्या पत्रान्वये बंदी घालण्यात आली आहे. सदर बंदीतून महिला पतसंस्था व पगारदार पतसंस्थांना वगळण्यात आलेले आहे.

**८. विविध कार्यकारी सहकारी संस्था नोंदणी अर्जासोबत जोडावयाच्या कागदपत्रांची चेकलिस्ट :--**

१. कोर्ट फी स्टँम्प.

२. नियोजित संस्थेत सामील होऊ इच्छिणा-या सभासदांची यादी, त्यांनी धारण केलेले बागायती / जिरायती क्षेत्र.

३. संस्थेच्या कार्यक्षेत्रात असलेले एकूण जिरायती / बागायती क्षेत्र तलाठी यांचा दाखला.

४. कृषि पत पुरवठा जिरायती /बागायती क्षेत्रानुसार होऊ शकणारा एकूण कर्ज पुरवठा बँकेच्या दाखल्यासह.

५. संस्था अर्थक्षम होईल याची योजना.

६. पहिल्या सभेचे इतिवृत्त.

७. आदर्श उपविधीच्या ४ प्रती.

८. नोदणी फी भरलेले चलन.

९. शेअर्सची रक्कम जिल्हा मध्यवर्ती बँकेत भरणा केल्याचे बँक बँलन्स सर्टिफिकेट.

१०. आर्थिक पत्रके.

तथापि, वैद्यनाथन समितीच्या शिफारशीनुसार राज्य शासनाने केंद्र शासन व नाबार्ड बरोबर दि. १३.११.२००६ रोजी केलेल्या त्रिपक्षीय सामंजस्य कराराच्या (M.O.U.) अनुषंगाने सहकार आयुक्तांच्या दि. ५.३.२००७ च्या परिपत्रकानुसार नवीन विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्थांच्या नोदणीस बंदी आहे.

**९. विविध कार्यकारी सहकारी संस्था नोंदणीबाबत चेकलिस्ट :--**

(अ) कोंकण, मराठवाडा व विदर्भ विभागासाठी ----

(१) कोंकण,मराठवाडा व विदर्भ येथील महसूली विभागात किमान ३५ लाखांचा व्यवहार करु शकणा-या अर्थ समजण्यात यावा.

(२) ३५ लाखांपैकी किमान रु.२५ लाख कृषि कर्ज व्यवहार तर किमान १०लाख विक्री व पणन व्यवहाराशी निगडीत व्यवहार असावा.

(३) ज्या गावात संस्था नाही त्या गावात संस्था नोंदण्यात अर्थ नाही. परंतु, अशा नवीन संस्थेच्या व शेजारच्या गावातील अस्तित्त्वात असलेल्या संस्थेचा एकूण व्यवहार कमीतकमी १५ लाख होणारा असावा.

(४) या दोन्हीही संस्थांसाठी गट सचिव एकच असावा.

(ब) विकसित भागामध्ये नवीन संस्था नोंदविणेचे निकष ---

(१) किमान ५० लाखांचा व्यवहार असावा.

(२) ५० लाखांपैकी कमीतकमी रु. १५ लाख खतविक्री व पणन व्यवहाराशी निगडीत असावा.

(३) ज्या गावात एकही संस्था नाही, परंतु, हे गाव दुस-या गावच्या संस्थेच्या कार्यकक्षेत असेल तर त्या अस्तित्त्वातील संस्थेचा कर्ज पुरवठा कमी होईल हे गृहीत धरुन त्या अस्तित्त्वातील उर्वरित कर्ज पुरवठा रु. ५० लाखांपेक्षा कोणत्याही परिस्थितीत कमी होता कामा नये.

(४) एका गावात शक्य तो एकच संस्था असावी.

**१०. मजूर कामगार सहकारी संस्था नोंदणीसाठी जोडावयाचे कागदपत्रांची चेकलिस्ट :--**

१. कोर्ट फी स्टँम्प.
२. कमीतकमी २५ मजदूर सभासद सज्ञान असलेबाबत व मजूर असलेबाबत सक्षम अधिका-याचा दाखला.
३. पहिल्या सभेचे इतिवृत्त.
४. नोदणी फी भरलेले चलन.
५. शेअर्सची रक्कम जिल्हा मध्यवर्ती बँकेत भरणा केल्याचे बँक बँलन्स सर्टिफिकेट.
६. उपविधीच्या ४ प्रती.
७. कमीतकमी वर्षातून ३०० दिवस काम उपलब्ध होईल याची योजना.
८. कार्यक्षेत्रात एकूण उपलब्ध होऊ शकणा-या कामांची यादी सक्षम अधिका-याचे दाखल्यासह.
९. सभासदाचे ओळखपत्र (फोटोसह).
१०. नियोजित संस्थेची आर्थिक पत्रके.
११. विभागीय छाननी समितीचे शिफारसपत्र.

**११. पोट - नियम दुरुस्तीसाठी जोडावयाची कागदपत्रांची चेकलिस्ट :--**

१. कोर्ट फी स्टँम्प.
२. **पुरवणी क्र.१** : यामध्ये बँकेच्या वार्षिक सर्वसाधारण नोटीसीची तारीख.
   २.१ : पोट-नियमात ज्यांना नोटीस द्यावयाची पाहीजे त्या पध्दतीने दिली असल्याची माहिती,वेळ, ठिकाण,सभेची तारीख व दुरुस्त करावयाची माहिती नोटीसीत नमूद केली होती काय नोटीसीची मूळ प्रत.
   २.२ : पुरवणी नं.२ साधारण सभेच्या तारखेस असलेले एकूण सभासदांची संख्या.
३. कोरम होण्यासाठी जरुर असलेल्या सभासदांची संख्या.
४. साधारण सभेच्या ठरावाच्या पोट-नियम दुरुस्तीसंबंधी उतारा.

| पोट-नियम क्रमांक (१) | मंजूर झालेल्या पोट-नियमाच्या दुरुस्तीसंबंधाच्या ठरावाची शब्दयोजना (२) | ठरावाची सूचना (३) | ठरावास अनुमोदन देणा-याचे नाव (४) | ठरावास अनुकूल मत देणा-या सभासदांची संख्या (५) |
|---|---|---|---|---|
| | | | | |

सेक्रेटरी चेअरमन

**पुरवणी क्रमांक ३**

| पोट-नियमाच्या अनुक्रमांक (१) | सध्याचा पोट-नियम नियमांची शब्दरचना (२) | दुरुस्ती झाल्याप्रमाणे पोट-नियमाची शब्दयोजना (३) | दुरुस्तीचे कारण (४) |
|---|---|---|---|
| | | | |

सेक्रेटरी चेअरमन

**पुरवणी क्रमांक ४**

बँकेचे नाव / संस्थचे नाव

दिनांक ---------------- रोजी भरलेल्या साधारण / विशेष सभेत मंजूर झालेल्या दुरुस्त पोट - नियमांची नक्कल.

| दुरुस्त झालेल्या पोट-नियमांचा अनुक्रम (१) | दुरुस्त झाल्यानंतर होणा-या पोट-नियमाची शब्द योजना (२) |
|---|---|
| | |

**पुरवणी क्रमांक ५**

साधारण सभेच्या तारखेस संस्थेची परिस्थिती दर्शविणारी अधिक माहिती

१. संस्थेचे नाव व पत्ता ----

२. संस्थेचा नोंदणी क्रमांक ----

३. नोंदणीची तारीख संस्थेच्या शेवटच्या लेखापरिक्षणाचे वेळी (Audit).

४. (अ) पोट-नियमाप्रमाणे बाहेरील कर्जाची मर्यादा ----
(ब) बाहेरील कर्जाची प्रत्यक्ष रक्कम ----

५. पोट-नियमाप्रमाणे वैयक्तिक कर्जाचा मर्यादा ----

६. व्याजाच्या (ठेवीवरिल /कर्जावरिल) दर आणि भागावरिल डिव्हीडंडचा दर. ----

## १२. नावीन्यपूर्ण संस्था नोंदणीकामी दाखल करावयाच्या आवश्यक कागदपत्रांची चेकलिस्ट :--

१. नोंदणीसाठी अ नमुन्यातील अर्ज (किमान ११ व्यक्तींच्या स्वाक्षरीनिशी अर्ज करावा) दहा व्यक्ती एकाच कुटुंबातील असता कामा नये.

२. नियोजित संस्थेच्या पोट-नियमाच्या ४ प्रती.

३. नियोजित संस्थेत सामिल होत असलेल्या व प्रवेश फी भाग भांडवलापोटी रक्कम दिलेल्यांची नावे व दिलेल्या रकमांची माहिती.

४. बँकेत नियोजित संस्थेच्या नावे जमा रकमेचा बँकेचा दाखला.

५. नियोजित संस्थेचे कामकाज आर्थिकदृष्ट्या सक्षम कसे होणार आहे याबद्दलच्या संस्थेच्या कामाची योजना.

६. संस्थेस जागा उपलब्ध असल्याबाबतचा पुरावा.

७. संस्थेच्या उद्देश पूर्तीसाठी आवश्यक असणा-या इतर तद्नुषंगिक कागदपत्रे.

नियोजित संस्थेच्या मुख्य प्रवर्तकांनी संबंधित तालुक्याच्या / जिल्ह्याच्या नोंदणी अधिका-यांकडे बँकेत खाते उघडण्यासाठी प्रस्ताव ४ प्रतीत सादर करणे आवश्यक आहे. संस्था नोंदणीचा प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून २ महिन्यांच्या आत संस्था नोंदणी अधिका-यांकडून नोंदणीची योग्य ती कार्यवाही केली जाईल व संबंधितांस नोंदणी प्रमाणपत्र देण्यात येईल.

## १३. अविश्वास ठरावाच्या विचारासाठी समितीची विशेष सभा बोलाविण्याच्या मागणी पत्राचा नमुना :--

स्थळ :

दिनांक :

प्रति,

मा.निबंधक सहकारी संस्था, -------------------------

आम्ही सही करणार, -------------------- सहकारी संस्था, लि. च्या व्यवस्थापक समितीचे सदस्य आपणाला महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम ७३ (१) नुसार विनंती करतो की, सदर संस्थेच्या व्यवस्थापक समितीची विशेष सभा श्री./श्रीमती ---------------- सभापती /उप सभापती / अध्यक्ष /उपाध्यक्ष / सचिव /खजिनदार / इतर कोणीही पदाधिकारी यांच्यावरिल अविश्वास ठरावाच्या विचार करण्यासाठी बोलाविण्यात यावे.

२. अविश्वास ठराव प्रत सोबत जोडली आहे.

३. अविश्वास ठराव खालील व्यक्ती मांडतील.

| | नाव | सही |
|---|---|---|
| १. | ------------------------------------ | ------------------------- |
| २. | ------------------------------------ | ------------------------- |
| ३. | ------------------------------------ | ------------------------- |

आणि इतर जरुरीप्रमाणे.

**भाडेकरु मालकी हक्क गृहनिर्माण संस्था**

ज्या संस्थांची जमीन पट्टयावर किंवा पूर्ण मालकीच्या तत्वावर धारण केली असेल व जी घरे सदस्यांच्या मालकीची असतील किंवा होतील अशा गृहनिर्माण संस्थो नोंदणी प्रकरणासोबत दाखल करावयाच्या कागदपत्रांची यादी.

१. नमुना अ मध्ये संस्था नोंदणीच्या अर्जासोबत विवरणपत्र अ सहित ४ प्रती. महाराष्ट्र सहकारी संस्था नियम, १९६१, नियम ४(१).

२. ००.६५ पैसे कोर्ट फी स्टॅम्प्स.

३. विवरणपत्र ब (नियोजित) संस्थेबाबतची माहिती -- ४ प्रती (शासकीय परिपत्रक, दिनांक २ मे १९८०)

४. (अ) हिशोब पत्रके नमुना - ड.

५. नमुनेदार पोटनियमाच्या ४ प्रती.

६. बँक शिलकीचे प्रमाणपत्र जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, मर्या. / महाराष्ट्र राज्य सहकारी शिखर बँक, मर्या.

७. (नियोजित) गृहनिर्माण संस्थेची सविस्तर योजना.

८. रिझर्व्ह बँक / ट्रेझरी नोंदणी फी चलन रु. ५००/- बँकवर्ड क्लास सहकारी गृहनिर्माण संस्था रु. ५/-.

९. जागा खरेदीसंबंधी / खरेदी खत - १ सत्यप्रत.

१०. ७/१२ चा उतारा अथवा मालमत्ता रजिस्टर कार्डाचा उतारा १ प्रत जेथे लागू असल्यास.

११. नागरी कमाल जमीन धारणा कायद्यान्वये जागा मुक्त केले असल्यास त्याविषयीचे सक्षम अधिका-याच्या आदेशाची प्रत / अगर नागरी कमाल जमीन धारणा कायदा लागू नसल्यास त्यासंबंधीचा दाखला अगर मुख्य प्रवर्तकाचे प्रमाणपत्र.

१२. जागा शासनाने किंवा निमसरकारी संस्थेने देऊ केल्यास त्यांचे जागा देण्याबद्दलचे प्रमाणपत्र.

१३. जागा ट्रस्टची असल्यास धर्मादाय आयुक्त यांचा ना हरकत दाखला.

१४. जागा निवासी क्षेत्रात समाविष्ट असल्याबाबतचा दाखला.

१५. जागेविषयी शोध घेतल्याचा वकीलाचा दाखला (टायटल क्लिअरन्स सर्टिफिकेट) पुरेसे प्लॉट असल्याबाबतचा दाखला आराखडा.

१६. कमीतकमी कमी १० प्रवर्तक सभासदांचे (नियो.) गृहनिर्माण संस्थेच्या कार्यक्षेत्रात असल्याबाबतचे सक्षम अधिका-यासमोर नोंदलेले रु. ५ /- स्टॅम्प पेपरवर प्रतिज्ञा पत्र.

१७. नमुना एक्स मध्ये मुख्य प्रवर्तकाने हमी पत्र रु. ५/- स्टॅम्प पेपरवर सक्षम अधिका-यासमोर नोंदलेले.

१८. सभासद फर्मस / कंपन्या आहेत अशा फर्मस / कंपन्यांकडून सह्या करण्याबद्दल अधिकार दिले आहेत त्याबद्दलचे अधिकारपत्र.

**गृहतारण सहकारी संस्था**

१. नमुना अ मध्ये संस्था नोंदणीच्या अर्जासोबत विवरणपत्र अ सहित ४ प्रती. महाराष्ट्र सहकारी संस्था नियम, १९६१, नियम ४(१).

२. ००.६५ पैसे कोर्ट फी स्टॅम्प्स.

३. विवरणपत्र ब (नियाजित) संस्थेबाबतची माहिती --- ४ प्रती

४. विवरणपत्र क (नियाजित) संस्थेच्या प्रवर्तक सभासदांची माहिती --- ४ प्रती

५. (अ) हिशोब पत्रके नमुना - ड.
(ब ) नमुनेदार पोटनियमाच्या -- ४ प्रती.

६. बँक शिलकीचे प्रमाणपत्र जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, मर्या. / महाराष्ट्र राज्य सहकारी शिखर बँक, मर्या.

७. नियोजित गृहनिर्माण संस्थेची सविस्तर योजना.

८. रिझर्व्ह बँक / ट्रेझरी नोंदणी फी चलन रु. ५००/- मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्था रु. ५/-.

९. जागा खरेदीसंबंधी साठेखत / खरेदी खत जागा मालकी दाखला १ सत्यप्रत (प्रत्येक प्रवर्तकांची)

१०. ७/१२ चा उतारा अथवा मालमत्ता रजिस्टर कार्डाचा उतारा १ प्रत.

११. नागरी कमाल जमीन धारणा कायद्यान्वये जागा मुक्त केले असल्यास त्याविषयीचे सक्षम अधिका-याच्या आदेशाची प्रत अथवा जमीन धारणा कायदा लागू नसल्यास त्या संबंधीचा दाखला अगर मुख्य प्रवर्तकाचे प्रमाणपत्र.

१२. जागा शासनाने किंवा निमसरकारी संस्थेने देऊ केल्यास त्यांचे जागा देण्याबद्दलचे प्रमाणपत्र.

१३. जागा ट्रस्टची असल्यास धर्मादाय आयुक्त यांचा ना हरकत दाखला.

१४. जागा निवासी क्षेत्रात समाविष्ट असल्याबाबतचा दाखला.

१५. प्लॉट बिगरशेती केलेचा सक्षम अधिका-याचा दाखला.

१६. कमीतकमी कमी १० प्रवर्तक सभासदांचे नियाजित गृहतारण संस्थेच्या कार्यक्षेत्रात निवास असल्याबाबतचे सक्षम अधिका-याचेसमोर नोंदलेले रु. ५ /- स्टॅम्प पेपरवर प्रतिज्ञा पत्र.

१७. नमुना एक्स मध्ये मुख्य प्रवर्तकाने हमी पत्र रु. ५/- स्टॅम्प पेपरवर सक्षम अधिका-यासमोर नोंदलेले.

१८. जेथे प्रवर्तक सभासद फर्मस / कंपन्या आहेत अशा फर्मस / कंपन्यांकडून सह्या करण्याबद्दल ज्यांना अधिकार दिले आहेत त्याबद्दलचे अधिकारपत्र.

१९. नियोजित संस्थेच्या नोंदणी प्रकरणांवर संस्थेच्या एकूण सभासदांच्या ९० टक्के प्रवर्तक सभासदांच्या सह्या असाव्यात.

२०. नियोजित संस्थेचे नाव राखून ठेवणेबद्दल दिलेल्या आदेशाची प्रत राखेन ठेवणेची मुदत जर संपली असेल तर मुदत वाढवून दिलेबद्दलची आदेशाची प्रत.

१६.

## साखर आयुक्त
## महाराष्ट्र राज्य, पुणे.

**सहकारी साखर कारखान्यांची नोंदणी**

सहकारी तत्वावर विविध गाळप क्षमतेचे उदा. १२५० मे. टन ते ५००० मे. टन क्षमतेचे कारखाने या कार्यालयामार्फत नोंदविले जातात.

**नोंदीसाठी आवश्यक असणा-या बाबी**

१. कमीकमी ५०० सभासद.
२. शासनाच्या आदेशाप्रमाणे गोळा करावयाचे भाग -भांडवल.
३. प्रकल्प अहवाल.
४. नोंदणी फी भरणा.
५. प्रस्ताव विहित नमुन्यात नमुना " अ " सहीत.

नोंदणीचा प्रस्ताव दाखल करणे अगोदर मुख्य प्रवर्तकाची निवड करुन बँकेत खाते उघडण्याची परवानगी प्राप्त करुन घ्यावी लागते. बँकेत खाते उघडण्याची परवानगी दिल्यावर आवश्यक ते भाग - भांडवल गोळा झाल्यावर नोंदणीचा प्रस्ताव दाखल करावा लागतो. नोंदणी करणे अगोदर शासनाची पूर्व परवानगी घेणे आवश्यक आहे. साधारणपणे १२५० मे. टन क्षमतेच्या कारखान्यास एका हंगामात २ लाख टन तर २५०० मे. टन क्षमतेच्या कारखान्यास ४ लाख मे. टन उसाची आवश्यकता आहे. जर एकाद्या नियोजित कारखान्याने अस्तित्त्वात असलेल्या साखर कारखान्याच्या कार्यक्षेत्रातील काही गावाचा समावेश केला असेल तर अशा नियोजित कारखान्यास बँकेत खाते उघडण्याची परवानगी देणे अगोदर ज्या कारखान्याच्या कार्यक्षेत्रातील गावांची मागणी केलेली असते त्या कारखान्यांना सुनावणी देणे आवश्यक असते. नोंदणीचे प्रस्ताव प्रादेशिक सहसंचालक (साखर) कार्यालयामार्फत देखील दाखल करता येतात. नोंदणी प्रस्ताव निबंधकाकडे दाखल केल्यापासून दोन महिन्यांचे आत नोदंणी करणे आवश्यक आहे. निबंधकाने नोंदणी जर नाकारली तर महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम १५२ अन्वये राज्य शासनाकडे अपील दाखल करता येईल.

**नोंदीसाठी आवश्यक असणा-या बाबी**

| | |
|---|---|
| १ प्रकरण कोणाकडे दाखल करावयाचे. | : साखर आयुक्त, महाराष्ट राज्य, पुणे. |
| २. नोंदणीसाठी आवश्यक असलेल्या अटी /बाबी | : (१) भाग - भांडवल.<br>: (२) आयइएम दाखला.<br>: (३) प्रकल्प अहवाल.<br>: (४) नोंदणी फी.<br>: (५) अस्तित्वात असलेल्या कारखानांच्या क्षेत्रापासून नवीन कारखाना कार्यक्षेत्र १५ कि.मी.च्या अंतरावर असावे.<br>: (६) प्रस्ताव विहित नमुना अ.<br>: (७) सभासद यादी. |
| ३. नोंदणी किती दिवसात करणेत यावी | : निबधक याचेंकडे प्रस्ताव दाखल झाल्यापासून दोन महिन्यांचे आत प्रस्ताव निर्णय घेणे बंधनाकारक. |
| ४. नोंदणी नाकारली तर कोणाकडे अपील दाखल करावयाचे | : राज्य शासनाकडे महाराष्ट्र सहकारी संस्था कायदा, १९६० चे कलम १५२ अन्वये. |

**खुले सभासदत्व**

एकादी व्यक्ती कारखान्याचे सभासद होणेसंबंधी कारखान्याच्या उपविधीतील तरतुदीनुसार महाराष्ट्र सहकारी संस्थांचा कायदा व नियम यामधील तरतुदींची पूर्तता केली / करीत असल्यास अशी व्यक्ती त्याच्या कार्यक्षेत्रातील कारखान्याचे सभासद होण्यास पात्र ठरते. जर अशी पूर्तता करुनही जर कारखाना त्या व्यक्तीस सभासद करुन घेत नसेल तर सदर व्यक्ती महाराष्ट्र सहकारी संस्थांचा कायदा, १९६० चे कलम २३ (२) अन्वये निबंधकाकडे अपील करु शकेल व तसे ३ महिन्यांचे आत निकाली काढणे आवश्यक आहे. जर उक्त कालावधीत निबधकास अपील निकाली काढता आले नाही तर तशी विलंबाची कारणे नमूद करतील.

२. निबंधकाने अपीलावर दिलेला निर्णय अंतिम असेल त्याने आपला निर्णय संबंधितांस १५ दिवसांचे आत कळविला पाहिजे.

३. एकाद्या पात्र व्यक्तीने तिला सदस्य म्हणून दाखल करुन घेण्यासाठी केलेला अर्ज किंवा तिने सदस्यत्वासंबंधी भरलेली रक्कम किंवा एकाद्या संस्थेने नकार दिला असेल तर अशा व्यक्तीस सभासदत्वासंबंधीताच्या कोणत्याही व्यक्तीस निंबधकाकडे अर्ज सादर करता येईल.

**कलम २३ (१-अ) नुसार निबंधकाकडे सदस्यत्वासाठी दाखल करावयाच्या अर्जाची कार्यरीती**

१. ज्या प्रसंगी संस्थेचे सदस्यत्व मिळविण्यास पात्र असलेल्या व्यक्तीचा सदस्यत्वाचा अर्ज जेव्हा संस्था नाकारते. अशा प्रसंगी ती व्यक्ती निबंधक यांचेकडे नमुना ह-१ मध्ये अर्ज करील व या अर्जासोबत जरुर असलेले भागपत्राची रक्कम व प्रवेश फीची रक्कम सादर करील.

२. निबंधक असा अर्ज आल्यावर तो अर्ज, भागाचे पैसे व प्रवेश फीचे पैसे मिळाल्यापासून ३० दिवसांच्या आत, तो संस्थेकडे अर्ज, शेअरची व प्रवेश फी ची रक्कम पाठवील.

३. संस्थेने पोट -नियम (२) मध्ये नमूद केलेल्या अर्जासंबंधी निर्णय घेतला पाहिजे आणि त्याबाबतचा निर्णय अर्ज मिळाल्यापासून ६० दिवसांच्या आत अर्जदारास कळविला पाहिजे आणि यासंबंधी अर्जदारास ६० दिवसांच्या आत कोणताही निर्णय न कळविल्यास, अर्जदाराला संस्थेने सभासद करुन घेण्यात आले आहे असे समजण्यात येईल.

४. जर संस्थेने अर्जदारास संस्थेस प्रवेश देण्यास नकार दिला असेल तर, पोट -नियम (३) मध्ये नमूद केल्यानुसार, सदस्यत्व का देता येत नाही याची कारणे देऊन त्या सदस्याची भागाची व प्रवेश फीची रक्कम त्या कारण दिलेल्या नकारासह परत केली पाहिजे. जर संस्था असे करण्यात कसूर करत असेल तर त्या रकमेवर कळविण्यात आल्याच्या तारखेपासून १० % या दराने व्याजाची आकारणी करण्यात येईल व ती रक्कम जमीन महसूलाच्या थकबाकीप्रमाणे संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

**सभासदत्वासंबंधी**

| | |
|---|---|
| (१) प्रथम अर्ज कोणाकडे करावयाचा | : प्रथम संस्थेकडे व संस्थेने नकार दिला दिला तर निबंधकाकडे. |
| (२) सभासद होण्यासाठी पात्रता व आवश्यक बाबी | : (१) पोट - नियम तरतुदीप्रमाणे आवश्यक असणारी शेअर्स व प्रवेश फी भरणे.<br>(२) ऊसाच्या क्षेत्रासंबधीचे ७/ १२ उतारा.<br>(३) विहित नमुन्यात अर्ज.<br>मात्र अशा व्यक्तीस यासंबधी महाराष्ट्र सहकारी संस्था कायदा, १९६० त्यावरिल नियम व उपविधीमधील यासंबंधीची पूर्तता केली पाहिजे.<br>(१) व्यक्ती सज्ञान असली पाहिजे.<br>(२) तिचे वय १८ वर्षे पूर्ण असले पाहिजे. |
| (३) किती कालावधीत निर्णय घ्यावयाचा आहे | : नमुना १ मध्ये सदर व्यक्तीस निबंधकाकडे अर्ज आल्यावर ३० दिवसांचे आत संस्थेकडे अर्ज व शेअर्सची फी पाठविणे. संस्थेने सदरील अर्जावर ६० दिवसांच्या आत निर्णय घेऊन कळविला पाहिजे.आणि ६० दिवसांचे आत निर्णय कळविला नाही तर निबंधकाने सभासदत्व दिले असे घोषित करण्यात येईल व तसे संस्थेस कळविले जाईल. जर सभासद करणेचे नाकारले, त्यासंबंधी कारणे देणे आवश्यक आहे व सोबत भागाची फी रक्कम पाठविणे आवश्यक आहे.जर संस्था असे करण्यास कसूर करीत असेल तर त्या रकमेचा १५ % व्याज संस्थेकडून वसूल करण्यात येईल. |

## कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
## यांना शितगृह बांधणी कर्जासाठी व इतर प्रकारचे कर्ज व भाग भांडवल मागणी अर्जासोबत पाठवावयाचा अर्जाचा नमुना

प्रति,

मा. कृषि पणन संचालक,
महाराष्ट्र राज्य, पुणे.

**विषय :** राष्ट्रीय सहकारी विकास योजनेतंर्गत बहुउद्देशीय शितगृह उभारण्यासाठी कर्ज व शासकीय भाग भांडवल मिळणेबाबत.

कृपया, वरील विषयाकडे आपले लक्ष वेधण्यात येत आहे.

सोबत या संस्थेस उपरोक्त योजनेतंर्गत अर्थसहाय्य मिळणे जरुरीचे असल्याने कृपया रु. ---------------- लाखाच्या अर्थसहाय्याच्या प्रस्तावाच्या चार प्रतीत या पत्रासोबत सादर करण्यात येत आहेत.

संस्थेची माहिती खालीलप्रमाणे व तशी सहपत्रेही सोबत जोडली आहेत : ---

| | |
|---|---|
| १. संस्थेचे नाव / पत्ता | |
| २. संस्थेचा नोदणी क्रमांक / दिनांक : | |
| ३. संस्थेचे कार्यक्षेत्र : | |
| ४. संस्थेचा उद्देश : | |
| ५. प्रशासकीय सभेतील संमत ठरावाची प्रत : | |
| ६. सभासद संख्या<br>(अ) भागभांडवल सभासद<br>शासन<br>रा.स.वि.नि.<br>एकूण | |
| ७. संस्था हाताळत असलेल्या पिकाचे उत्पादनाची आकडेवारी (टनात रु.लाखात) | |
| ८ व्यवस्थापक पूर्ण वेळ काम करीत आहे किंवा कसे ?<br>व्यवस्थापक प्रशिक्षित आहे किंवा कसे ? : | |
| ९. संचालक मंडळ<br>(१) शासन नियुक्त / प्रशासक<br>(२) निवडून आलेले | |
| १०. मागील वार्षिक सर्वसाधारण सभेची तारीख : | |
| ११. रा.स.वि.नि. च्या अटीनुसार / आकृतीबंध निकषानुसार प्रकल्प अहवालाची किंमत (प्रकल्प अहवाल सोबत जोडलेला आहे.) | |
| १२. संस्थेचा ऑडीट वर्ग (मागील ३ वर्षाचा)लेखापरिक्षण झाले किंवा कसे (मुदत /तारीख वर्गवारी) | |
| १३. पाणीपुरवठा संबंधीचा दाखला / व्यवस्था (तपशील द्या) | |
| १४. पोट-नियमाची प्रत | |
| १५. शितगृहाचे प्लॅन इस्टिमेट नकाशासह | |
| १६. संस्थेची मागील ३ वर्षाची उलाढाल तसेच पुढील ३ वर्षाची अंदाजित उलाढाल (वस्तु,वजन व किंमत इ.) ३ वर्षाची हिशोब पत्रके / नफा / तोटा / ताळेबंद इ. जोडण्यात यावे. | |
| १७. अद्ययावत व लेखापरीक्षकांनी प्रमाणित केलेली आर्थिक पत्रके संस्था नफ्यात आहे अथवा तोट्यात. | |

| | |
|---|---|
| १८. संस्थने यापूर्वी अर्थसहाय्य घेतले असल्यास त्याचा तपशिल / वर्ष / रक्कम इ.लाखात | |
| १९. अथेसहाय्याचा परतफेडीचा तपशिल<br>देणे रक्कम परतफेड रक्कम बाकी<br>मु. व्याज मु. व्याज मु. व्याज<br>विनियोग केला नसल्यास त्या बाबतची कायमिमांसा | |
| २०. भाग-भांडवल विमोचन निधी<br>(केलेली तदतूद त्याची गुंतवणूक तपशिल) | |
| २१. संस्थेचा दिनांक ३१.०३ अखेरचा संचित तोटा : | |
| २२. पूर्वी घेतलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग व त्यामुहे संस्थेची झालेली प्रगती. | |
| २३. प्रकरणातील बाबीच्या सत्यतेबद्दलचे मा. चेअरमन / सेक्रेटरी / मॅनेजर यांचे रु . २५ /- च्या स्टॅम्प पेपरवर शपथपत्र. | |
| २४. प्रकल्प खर्चाची उर्वरित रक्कम संस्था कशी उभी करणार या संबंधीच्या आर्थिक सहाय्यासंबंधी बँकेचे संमतीपत्र. | |
| २५ प्रकल्पात बांधकाम समाविष्ट असल्यास जागेच्याउपलब्धतेबाबतचा स्थानिक स्वराज्य संस्थेचा दाखला :<br>(ग्रामपंचायत /नगरपालिका / महानगरपालिका)<br>: | |
| २६. बांधकाम साहित्य खेरीज इतर वस्तुच्या बाबतीत अधिकृत वितरकांचा इनव्हॉईस /चलन / कोटेशनच्या प्रती सोबत जोडाव्यात. | |

सोबत वरीप्रमाणे कागदपत्रे व रा.स.वि.नि. च्या विहित नमुन्यात प्रस्तावाची माहिती भरुन त्झे सोबत सादर करण्यात आली आहे. तरी वरील प्रस्तावाचा सहानुभूतीपूर्वक विचार करुन प्रस्तावाची शिफारस करावी, ही विनंती.

सही /-

(चेअरमन / सेक्रेटरी / संस्थेचा शिक्का )

## संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर यांच्याकडील योजना.

### १. हातमाग कापडाच्या उत्कृष नमुन्यासाठी बक्षिसे :

राज्यातील हातमाग विणकरांना प्रोत्साहन देणे,त्यांच्या पारंपारिक व अपारंपारिक वाणाच्या विणकरीला वाव मिळावा या दृष्टीकोनातुन ही योजना राबविण्यात येत आहे.

शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. हातमाग-२००८/प्र.क्र. ९७/टेक्स ३, दि. २९.०९.२००८ अन्वये विणकरांच्या बक्षिसांच्या रकमेत वाढ करुन खालीलप्रमाणे सुधारित पध्दतीने योजना राबविण्याचे शासनाचे धोरण आहे :-

| स्पर्धेचे प्रकार व स्पर्धांची संख्या | पारंपारिक व अपारंपारिक वाणाकरिता प्रत्येकी हातमाग परंपरागत वाणाकरिता द्यावयाच्या बक्षिसांची रक्कम. | | | पारंपारिक व अपारंपारिक स्पर्धाच्या आयोजनाकरिता आवश्यक प्रशासकीय खर्चासाठी अर्थसहाय्याची रक्कम |
|---|---|---|---|---|
| | पहिले बक्षिस | दुसरे बक्षिस | तिसरे बक्षिस | |
| राज्यस्तरीय हातमाग कापड स्पर्धा (फक्त एका ठिकाणी) | २५,००० | २०,००० | १५,००० | २४,००० |
| जिल्हास्तरीय हातमाग कापड स्पर्धा (एकुण ६ ठिकाणी) | १०,००० | ५,००० | ३,००० | ७२,००० |
| अनुसूचित जातीच्या विणकरांसाठी हातमाग कापड स्पर्धा (एकुण ५ ठिकाणी) | १०,००० | ५,००० | ३,००० | ६०,००० |
| एकुण वार्षिक खर्च | २,७०,००० | १,५०,००० | ९६,००० | १,५६,००० |
| **एकुण वार्षिक खर्च रु ६,७२,०००** | | | | |

हातमाग विणकरांनी बक्षिसांकरिता हातमाग कापडाच्या नमुन्यासह संबधित जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था किंवा प्रादेशिक उपसंचालक वस्त्रोद्योग यांचेकडे अर्ज केल्यानंतर जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था यांचे स्तरावर हातमाग कापड स्पर्धा आयोजित करण्यात येउन नियुक्त निवड समितीमार्फत बक्षिसपात्र नमुन्यांची निवड करण्यात येते. त्यानुसार हातमाग कापडाच्या उत्कृष्ठ बक्षिसपात्र नमुन्यासाठी संबधित विणकरांना बक्षिसे वितरित करण्यात येतात.या जिल्हा स्तरावरुन सर्वसाधारण गटातील व अनुसूचित जातीच्या विणकरांच्या गटातील विजेत्यांची राज्य स्तरीय हातमाग कापड स्पर्धा प्रादेशिक उपसंचालक वस्त्रोद्योग नागपुर यांचेमार्फत आयोजित करण्यात येते.

### २. तांत्रिक उच्च शिक्षण :

विणकर समाजातील गरीब विद्यार्थ्यांना हातमाग तंत्रविज्ञान पदविका अभ्यासक्रमाव्दारे प्रशिक्षित करुन त्याचे ज्ञानाचा फायदा हातमाग क्षेत्रासाठी व्हावा हा योजनेचा मुख्य उद्देश आहे.

दरवर्षी वाराणसी (उत्तर प्रदेश) व व्यंकटगिरी (आंध्र प्रदेश) येथील भारतीय हातमाग तंत्रविज्ञान संस्थेसाठी १५ प्रशिक्षणार्थीची (वाराणसी १३ प्रशिक्षणार्थी व व्यंकटगिरी २ प्रशिक्षणार्थी) निवड करुन प्रशिक्षासाठी पाठविण्यात येते. या निवड करण्यात आलेल्या प्रशिक्षणार्थीना या संस्थेमार्फत प्रथम, व्दितीय व तृतीय वर्षातील विद्यार्थ्यांना दरमहा रु ४००, ४५० व ५०० अनुक्रमे विद्यावेतन देण्यात येते. या सर्व जागेसाठी देण्यात येत असलेल्या विद्यावेतनाचा खर्च राज्य व केन्द्र शासन ५०:५० याप्रमाणे करण्यात येतो. या व्यतिरिक्त प्रशिक्षणार्थीना या विद्यावेतनाच्या व्यतिरिक्त रु ३०० दरमहा अतिरिक्त विद्यावेतन म्हणुन राज्य शासनाकडुन देण्यात येते.

संचालनालय वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासना नागपुर यांचेकडुन जाहिरात प्रसिध्द करण्यात येउन तांत्रिक शिक्षण घेण्याकरिता (३ वर्षीय हातमाग तंत्रविज्ञान पदविका अभ्यासक्रम) आवश्यक अर्हताप्राप्त उमेदवारांकडुन अर्ज मागविण्यात येतात. अर्हताप्राप्त उमेदवारांची गुणवत्ता यादी तयार करुन ती भारतीय हातमाग तंत्रविज्ञान संस्था, वाराणशी येथील पुढील कार्यवाहीसाठी पाठविण्यात येते.

## ३. जाहिराती व प्रसिध्दी योजना :

हातमाग उद्योगाला व उत्पादनाला विस्तृत प्रमाणात प्रसिध्दी मिळुन हातमाग कापडाच्या विक्रीमध्ये वाढ व्हावी व कापड उत्पादनाची मालिका कायम राहावी जेणेकरुन हातमाग विणकरांना रोजगार सातत्याने उपलब्ध होउ शकेल हा योजनेचा उद्देश आहे. हातमाग उद्योगाला व राज्यात उत्पादित होणा-या वाणाला आवश्यक प्रसिध्दी मिळावी या उद्देशाने सदर योजने अंतर्गत राज्य व जिल्हा पातळीवर हातमाग कापड प्रदर्शनीचे आयोजन करण्यात येत आहे. या प्रदर्शनीवरील व्यवस्थापकीय तसेच ईतर खर्च सदर योजने अंतर्गत उपलब्ध तरतुदीतुन करण्यात येतो.

शिवाय केन्द्र पुरस्कृत मार्केटींग ॲन्ड प्रमोशन स्किम अंतर्गत राज्यात वेगवेगळया पातळीवर वर्षभरात आयोजित होणा-या हातमाग प्रदर्शनीच्या अतिरिक्त खर्चाची प्रतिपुर्ती देखील सदर योजने अंतर्गत राज्य शासनाच्या उपलब्ध तरतुदीतुन करण्यात येते. योजनेच्या निकषाप्रमाणे हातमाग कापड प्रदर्शनी आयोजित करण्याकरिता आयोजक संस्था म्हणुन राज्यस्तरीय हातमाग शिखर संस्था, राज्य हातमाग महामंडळ/ सहकारी महासंघ यांची नियुक्ती करण्यात येते. सदर प्रदर्शनीचे आयोजनाकरिता केन्द्र शासनाकडुन निश्चित करण्यात आलेल्या अर्थसहाय्याचा तपशिल खालीलप्रमाणे :-

अ) जिल्हा हातमाग प्रदर्शनीकरिता ... रु २.०० लाख पर्यंत

ब) राज्यस्तरीय हातमाग प्रदर्शनीकरिता ... रु ८.०० लाख पर्यंत
(स्पेशल हॅन्डलूम एक्सपो)

क) राष्ट्रीय हातमाग प्रदर्शनी करिता ... रु १८.०० लाख पर्यंत
(नॅशनल हॅन्डलूम एक्सपो, १५ लाखापेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या शहराचे ठिकाणी)

ड) राष्ट्रीय हातमाग प्रदर्शनी करिता ... रु ३८.०० लाख पर्यंत
(नॅशनल हॅन्डलूम एक्सपो, १५ लाखापेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या शहराचे ठिकाणी)

या हातमाग प्रदर्शनी आयोजित करण्याकरिता आयोजक संस्थेने प्रस्तावित प्रदर्शनीचे प्रस्ताव विहीत नमुन्यात संचालनालय वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर यांचेमार्फत विकास आयुक्त (हातमाग) भारत सरकार नवि दिल्ली यांचेकडे सादर करावयाचे असतात. विकास आयुक्त (हातमाग) भारत सरकार यांनी प्रदर्शनीचे स्वरुप, कालावधी व ठिकाण मंजुर केल्याप्रमाणे आयोजक संस्थेमार्फत हातमाग प्रदर्शनी आयोजित करण्यात येते. योजनेच्या निकषाप्रमाणे उपरोक्त प्रदर्शनी ना नफा नो तोटा या पध्दतीवर आयोजित करण्यात येते.

प्रदर्शनी संपल्यानंतर प्रदर्शनीचे आयोजनावर झालेल्या खर्चाचे प्रतिपुर्तीकरिता अर्थसहाय्यक मागणी प्रस्ताव संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर यांचेमार्फत केन्द्र शासनास सादर करण्यात येतात व त्यानुसार आयोजक संस्थाना केन्द्र शासनाकडुन परस्पर अर्थसहाय्य प्राप्त होते.

## ४. आरोग्य विमा योजना :

सदर योजना केन्द्र शासनाने सन् २००५-०६ पासुन सुरु केली असुन, हातमाग विणकरांना या योजनेअंतर्गत विमा संरक्षण मिळावे हा या योजनेचा उद्देश आहे. केन्द्र शासनाचे विकास आयुक्त (हातमाग) नवि दिल्ली यांचे पत्र क्र. १/१/२००९ दि. ३.०८.२००९ व दि. १९.१०.२००९ अन्वयें हातमाग विणकरांसाठी/ कामगारांसाठी आरोग्य विमा योजना सन् २००९-१० या आर्थिक वर्षात सुधारित स्वरुपात राबविण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्याप्रमाणे सदर योजना आय.सी.आय.सी.आय. लोम्बार्ड जनरल इन्शुरन्स यांचे सहकार्याने राबविण्यात येते. या योजनेचा लाभ स्वतः सभासद त्याची पत्नी आणि सभासदाची २ अपत्ये यांना घेता येतो. यात सहभागी होणा-या लाभार्थीचे वय १ दिवस ते ८० वर्षापर्यंतचे असलेले पात्र आहेत. सदर सुधारित योजनेप्रमाणे आरोग्य विमा योजने अंतर्गत विणकरांचा सहभाग १७९.२० प्रति वर्ष व केन्द्र शासनाचा सहभाग रु ८०९.१० प्रति वर्ष असुन या प्रमाणे एकुण विम्याचा हप्ता ९८८.३० चा राहणार आहे. परंतु विणकर रु १७९.२० भरण्यास तयार नसेल तर कमीत कमी रु ५०.०० भरावयाचे असून उर्वरित रक्कम रु १२९.२० राज्य शासनाने भरावयाचे आहे. केन्द्र शासन आपला सहभाग परस्पर आय.सी.आय.सी.आय. लोम्बार्ड जनरल इन्शुरन्स कंपनीला अदा करते. या योजने अंतर्गत वार्षिक कमाल रु १५,००० पर्यंत फायदा मिळणार असुन यामध्ये रोगनिदान, डोळे तपासणी, चष्मा खरेदी, इस्पितळातील खर्च, बाळांतपणाचा खर्च, दंतरोग चिकित्सा व उपचार ई. बाबींचा समावेश आहे.

योजनेचा लाभ घेण्याकरिता हातमाग विणकराने/ कारागिराने परिपुर्ण अर्ज (विहीत नमुन्यात) संबधित प्रादेशिक उपसंचालक वस्त्रोद्योग यांचेकडे द्यावयाचा आहे. अर्जाची छाननी करुन हातमाग धारकाच्या वार्षिक विम्याचे प्रिमियमसह तो संबधित आय.सी.आय.सी.आय. लोम्बार्ड जनरल इन्शुरन्स कंपनीकडे पाठविण्यात येतो.

## ५. महात्मा गांधी विणकर विमा योजना :

सदर योजना सन् २००५-०६ पासुन सुरु केली असून केन्द्र शासनाने हातमाग विणकरांसाठी महात्मा गांधी विणकर विमा योजना सन् २००७-०८ या आर्थिक वर्षापासुन पुन्हा सुधारित स्वरुपात सुरु केलेली आहे. सदर योजना भारतीय जीवन विमा निगम यांचे सहकार्याने राबविण्यात येते. ज्या हातमाग विणकरांचे कमीतकमी ५० टक्के उत्पन्न हे हातमाग व्यवसायापासुन आहे असे हातमाग विणकर या योजनेखाली विमा संरक्षण मिळण्यास पात्र आहेत. विणकर सभासदाचे वय १८ ते ५९ वर्षापर्यंत असणे बंधनकारक आहे. सदर योजनेप्रमाणे हातमाग विणकराचा सहभाग रु ८० प्रतिवर्ष, भारतीय जीवन विमा निगम यांचा सहभाग रु १०० प्रतिवर्ष व केन्द्र शासनाचा सहभाग रु १५० पतिवर्ष असून वार्षिक एकुण विम्याचा हप्ता रु ३३० आहे.
केन्द्र शासन आपला सहभाग परस्पर भारतीय जीवन विमा निगम यांना अदा करते. हातमाग विणकराचा नैसर्गिक मृत्यु झाल्यास रु ६०,००० ची रक्कम देय असून अपघातात मृत्यु झाल्यास रु १,५०,००० ची देय आहे. तसेच विणकरांच्या ९ वी ते १२ वी मध्ये शिक्षण घेणा-या २ मुलांना रु ३०० दर तिमाही शिष्यवृत्ती म्हणुन मिळते.

योजनेचा लाभ घेण्याकरिता हातमाग विणकराने/ कारागिराने परिपुर्ण अर्ज विहीत नमुन्यात संबधित प्रादेशिक उपसंचालक वस्त्रोद्योग यांचेकडे द्यावयाचा आहे. अर्जाची छाननी करुन हातमाग धारकाच्या वार्षिक विमा प्रिमियमसह तो भारतीय जीवन विमा निगम कडे पाठविण्यात येतो.

## ६. गिरणीचे ठिकाणावरील दराने सूत पुरवठा (मिल गेट प्राईस योजना) :

मिल गेट प्राईस योजने अंतर्गत हातमाग विणकर संस्थाना सवलतीच्या दराने सूत पूरवठा उपलब्ध व्हावा हा योजनेचा उद्देश आहे. या योजने अंतर्गत हातमाग विणकर संस्थांना सवलतीच्या दराने सूत पुरवठा करण्यात येत असून खालील संस्थांना या योजनेचा फायदा घेता येतो.

१. प्रायमरी/ शिखर/ प्रादेशिक/ संस्था,
२. हातमाग विकास केन्द्र,
३. हॅन्डलूम प्रोडुसर्स/ एक्सपोर्टर्स,
४. सर्व प्रमाणित एक्सपोर्ट हाऊसेस,
५. नोंदणी/ मान्यता असलेल्या असोसिएशनचे सभासद,
६. नॉन गव्ह. ऑर्गनायझेशन,
७. विकास आयुक्त (हातमाग) यांनी मान्यता दिलेल्या ईतर संस्था.

सदरहू योजने अंतर्गत मुख्य समन्वय संस्था म्हणुन राष्ट्रीय हातमाग विकास महामंडळ लखनौ यांची नियुक्ती करण्यात आली आहे. वरील एजन्सीनी या महामंडळाकडे सूताची मागणी नोंदवून सदरचे महामंडळ सूत पुरवठा करणा-या सूत गिरण्यांशी समन्वय साधुन सूत पुरवठा करण्यात येतो.

## ७) थकित कर्जापैकी ५० टक्के कर्ज राज्य शासनाने भरण्याबाबत ...

राज्यातील प्राथमिक हातमाग विणकर सहकारी संस्थांचे दि. ३१.०३.२००४ पर्यंत कर्जाच्या ५० टक्के भार उचलण्याचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासन निर्णय दि. २३.०८.२००४ नुसार राज्यातील हातमाग विणकर सहकारी संस्थाचे दि. ३१.०३.२००४ पर्यंत बँका/ वित्तीय संस्था यांचेकडे असलेल्या थकित कर्जाचे बँका/ वित्तीय संस्था आणि प्राथमिक हातमाग विणकर संस्थांनी वाटाघाटीव्दारे निश्चित केलेल्या रकमेच्या ५० टक्के रक्कम शासनाने भरावी व उर्वरित ५० टक्के रिशेड्युलिंग करुन संस्था भरेल असा निर्णय घेतलेला आहे.

शासन परिपत्रक दि. ३१.१०.२००७ अन्वये लाभार्थी संस्था जेवढी रक्कम भरतील तेवढ्याच रकमेचा भरणा शासनाकडुन करण्यात येईल या करिता कार्यपध्दती शासनाकडुन निश्चित करण्यात आलेली आहे.

## ८) <u>एकात्मीक हातमाग विकास योजना ( आय. एच. डी. एस. )</u>

१. एकात्मीक हातमाग विकास योजना (आय.एच.डी.एस.) केंद्रिय पुरस्कृत योजना

एकराव्या पंचवार्षिक योजनेत राबविण्यात येणारी एकात्मीक हातमाग विकास योजना ही चार योजनांची म्हणजेच दिनदयाल हथकरघा प्रोत्साहन योजना, एकात्मीक हातमाग प्रशिक्षण परियोजना, एकात्मीक हातमाग सामूहीक विकास योजना आणि घरे व छपरे योजनामध्ये सुधारणा सहीत अथवा त्याच्याशिवाय आवश्यक घटकांना मिळवून केंद्रिय रुपात पुरस्कृत योजना म्हणून तयार करण्यात आलेली आहे.

२. योजनाचे विविध घटक :- या योजनेचे खालीलप्रमाणे चार घटक आहेत.

| अ.क्र | एकात्मीक हातमाग विकास योजनाचे घटक | एकात्मीक हातमाग विकास योजनाच्या आर्थिक सहाय्याचे उपघटक |
|---|---|---|
| क | ३०० ते ५०० च्या श्रेणीत असलेल्या हातमाग विणकरांच्या समूहाकरीता | 1. बेसलाइन सर्वेक्षण, निदान संबंधी अभ्यास व स्वयं सहायता गटाची निर्मिती (एसएचजी)<br>2. कन्सोर्टियम चे निर्माण<br>3. यार्न भंडारची स्थापना करण्याकरीता कॉरपस निधि<br>4. डिझाइन विकास व उत्पादन विविधीकरण<br>5. एकात्मीक सुविधा केंद्र/डाई हाऊस<br>6. प्रचार व विपणन<br>7. योजनेचा प्रशासकीय खर्च<br>8. बेसिक इनपूट<br>9. कलाकुसरतेचा विकास<br>10. कार्यशाळेची निर्मिती |
| ख | समान भौगोलिक क्षेत्रात समूहाच्या बाहेर कार्यान्वीत असलेल्या विणकरांना योजनेचा सामूहीक फायदा | क. बेसिक इनपूट<br>ख. कार्यशाळेची निर्मिती<br>ग. कलाकूसरतेचा विकास |
| ग | हातमाग सहकारी संस्थांना आर्थिक सहाय्यता | 1. विपणन विकास सहाय्य<br>2. हातमाग संस्थांचे बळकटीकरण |
| घ | इतर | अभिनव विचारधारा<br>1. प्रचार मॉनेटरींग पर्यवेक्षण प्रशिक्षण आणि योजनांचे मूल्यांकन |

४. योजनाचे उद्येश

- विणकरांचा समूह तयार करुन त्यांचे उत्पादन लक्ष केंद्रित करणे.
- विणकरांच्या स्वयंभू विकासाकरीता त्यांच्या समूहाला आर्थिक मदत देणे. सहकार क्षेत्रात व सहकारी क्षेत्रा व्यतिरिक्त विणकरांना सदर सूनियोजीत योजनेव्दारा समाविष्ठ करुन घेणे.
- बाजारपेठेची आवश्यकता विचारात घेता उच्च प्रतीचे व विविध प्रकारचे उत्पादन करण्याकरीता प्रोत्साहन देणे.
- विणकरांना बाजारपेठ व उच्च प्रतीचे कापड तयार करण्याकरीता उपयूक्त अशी कार्यस्थळ उपलब्ध करुन देणे.
- बाजारपेठेतील डिझाईन व उत्पादन करण्यासाठी कार्यप्रणाली अंतर्गत संबधित क्षेत्रातील व्यवसायभिमूख तज्ञांना सामावून घेणे.
- वित्तीय संस्था/बँका कडून कर्ज उपलब्ध करुन घेण्याचे प्रक्रियेत सूलभता आणणे.
- सहकार क्षेत्रातील विणकरांना प्रोत्साहन देणे.
- संघटीत विणकरांच्या समूहाला आवश्यक असलेला कच्चा माल उपलब्ध करुन देण्याचे दृष्टीने उपाययोजना करणे.

## भाग क

(क) सामूहीक विकास कार्यक्रम ( ३०० ते ५०० हातमाग असलेल्या समूहाकरीता सहाय्य )

सामूहीक विकास धोरण एक दृष्टीगत संस्थाच्या रुपात विणकरांच्या समूहांचे निर्माण करुन त्या समूहाना आत्मनिर्भर करण्याचा आहे. ६२५ समूहांची स्थापना करावयाची असून त्यात ३०० ते ५०० हातमाग विणकर राहतील व हे ११ व्या पंचवार्षिक योजनेच्या दरम्यान सुरु करावयाच्या आहेत. यात १०० समूहांचाही समावेश आहे ज्यांचा अभ्यास यापूर्वीच २००६-०७ मध्ये पूर्ण केलेला असून २००७-०८ मध्ये या समूहांची घोषणा करण्यात आलेली आहे.

(क-१) समूहाची व्याख्या

हातमाग समूहाची व्याख्या अशी करता येईल की ज्या ठिकाणी हातमाग कापडाचे उत्पादन मोठया संख्येत होत असून उत्पादन हे बाजारपेठेनुरुप असेल. हे हातमाग एका प्रशासकीय जिल्हयात अथवा लगतच्या दुस-या जिल्हयाच्या सिमावर्ती भागातही असू शकेल. लघू आणि मोठया राज्यात जिथे गाव, तालूका, छोटया आकारात असेल तिथे गाव तालूक्याची संख्या वाढवता येईल.
जेणेकरुन समूहाची कमीत कमी संख्या सुनिश्चित करता येईल. देशात अनेक समूहामध्ये हातमागाची संख्या अपेक्षित पेक्षा जास्त आहे. पण योजनेच्या उद्येशानूसार त्या समूहानूसार ३०० ते ५०० या मर्यादेतच ठेवावा लागेल.

(क-२) बेस लाईन सर्व्हेक्षण, फलश्रूती संबंधी अभ्यास आणि सामूहीक विकास अधिकारी (सी.डी.ई)

(क- २.१) बेस लाईन सर्व्हेक्षण

बेस लाईन सर्व्हेक्षण ही समूहाची प्रोफाईल तयार करण्याकरीता करण्यात यावी त्यात हातमागाची संख्व्या, हातमागाचा प्रकार, विणकरांची संख्या (पुरुष/महिला-सामान्य/अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती/इतर मागासवर्गीय/अल्पसंख्यांक/इतर) वापरण्यात येणा-या सूताचा प्रकार, उत्पादनाचा प्रकार, विणकरांचे सरासरी उत्पन्न इत्यादि माहिती संकलीत करण्याकरीता प्रत्येक (३०० ते ५०० विणकर ) विणकराच्या घरी जाणे अपेक्षित आहे. बेस लाईन सर्व्हेक्षण व फलश्रूती संबंधी अभ्यास करण्याकरीता व समूहाचे प्रोफाईल तयार करण्याकरीता परिशिष्ट क-१ मध्ये माहिती घेण्यात यावी. बेस लाईन सव्हेक्षण आणि समूहात असलेले वेगवेगळे विणकरांना आर्थिक सहाय्येतेचे आवश्यकता इ. माहिती परिशिष्ट क-२ मध्ये घेण्यात यावी.

(क-२-२)फलश्रूती संबंधी अभ्यास

समूहाची फलश्रूती ही योजना राबविण्याकरीता उचललेले पहिले पाऊल आहे. ही त्या समूहातील शक्ती व दुर्बलता तसेच ज्या वातावरणात समूह कार्य करीत आहे त्या वातावरणाची दिशा दर्शविते. त्यावर उपाययोजना करुन कोणते पाऊल उचलणे आवश्यक आहे याबाबत दिशा दर्शविल. या फलश्रूतीच्या आधारे निश्चित दिशा व सभावीत उत्पादनाचा एक कालबध्द कार्यक्रम तयार करता येईल. प्रत्यक्ष कार्याला सुरुवात आपसी सांमजस्य व विश्वास निर्माण झाल्यानंतर समूहातील विणकरांचे सहमतीने हाती घेता येईल. फलश्रूतीचा उद्येश सध्या जे विणकर समूहात काम करीत आहेत त्याचे आकलन करणे त्याचे विश्लेषण करणे, उत्पादनचा प्रोफाईल करणे, उत्पादनाचे पॅटर्न उपलब्ध बाजारपेठ व भावी बाजारपेठेची संभावना समूहाची शक्ती, कमजोरी, अवसर व स्पर्धा यांचे सांगोपांग विश्लेषण करुन तसेच हातमाग विणकराकरीता कार्य करीत असलेल्या संस्था सेवाभावी संस्था इ. चा विश्लेषण करुन निर्णयापर्यत पोहचून त्यांचा योग्य उपयोग कशा करुन घेता येईल व त्याचेकडून अपेक्षित कार्य कसे करुन घेता येईल इ. बाबत शिफारस करणे हा आहे. यासंबंधी माहिती परिशिष्ट क-३ मध्ये घेण्यात यावी.

(क-२.३) सामूहीक विकास अधिकारी (सी.डी.ई.)

प्रत्येक कार्य करणारी संस्था ही प्रथम सामूहीक विकास अधिकारी यांची निवड करुन नियूक्ती करेल व त्याचे मुख्यालय प्रत्येक समूहामध्ये राहील. त्याची जबाबदारी योजना राबविण्याची राहील. सामूहीक विकास अधिकारी फलश्रूती संबंधी अभ्यास करेल व योजनेचा आराखडा तयार करेल. सामूहीक विकास अधिकारी योजनेच्या अनुसार कालबध्द कार्यक्रम तयार करुन त्याची अंमलबजावणी करेल. विणकरांचे स्वयंम सहाय्यता गटाची निर्मिती करुन त्यांची बँक/वित्तीय संस्थाशी गाठ घालून समन्वय साधेल. राज्य शासनाकरीता आवश्यक असलेला प्रकल्प अहवाल तयार करेल. राष्ट्रीय हथकरघा विकास निगम लखनऊ यांचेकडून अपेक्षित प्रमाणात उत्कृष्ठ सूत, रंग रसायने उपलब्ध करुन घेण्याकरीता समन्वय साधेल. एकात्मीक विकास प्रक्रियेत समूहाचे स्तरावर स्टेट होल्डर्सला सामील करुन घेईल. सामूहीक विकास अधिकारीच्या कामकाजात सहाय्यता करणे व त्याचेवर देखरेख ठेवण्याचे दृष्टीने देखरेख राखण्याचे दृष्टीने संचालक वस्त्रोद्योग यांचे अध्यक्षतेखाली एक एकात्मीक विकास समन्वय समिती

(सी.डी.सी.जी.) ची स्थापना करेल ज्यात विणकर स्वयंम सहाय्यता प्राथमिक हातमाग विणकर सहकारी संस्था हातमाग महामंडळे निर्यातदार संस्था आणि स्वयंम सहाय्यता संस्था राष्ट्रीय कृषि आणि ग्रामीण बॅंक (नाबार्ड) राज्य शासनाचे प्रतिनिधी इ. चा समावेश असेल.

(क-३) एकात्मीक हातमाग विकास समूहाकरीता आर्थिक सहाय्याचा आकृतीबंध

प्रत्येक समूह ३ वर्षाच्या कालावधीत पूर्ण करावयाचा असून त्याकरीता जास्तीत जास्त रुपये ६०.०० लाखाची आर्थिक मदत देण्यात येईल.

(अ.३.१) सामूहिक विकास : बेसलाइन सर्वेक्षण, फलश्रूती संबंधी अभ्यास आणि स्वयंम सहाय्यता समूहाची निर्मिती

निवड करण्यात आलेल्या समूहाकरीता सामूहीक विकास धोरण निश्चित करण्यात येईल ज्यामध्ये एक एजन्सीची नियूक्ती करुन ती एजन्सी बेसलाईन सर्वेक्षण व फलश्रूती संबंधी अभ्यास करेल आणि विविध स्टेट होल्डर्स सोबत विचार -विनिमय करुन एक सामूहीक विकास योजना तयार करेल. सदर एजन्सी समूहामध्ये स्वयंम सहायता गटाची स्थापना करेल आणि त्यांना कर्ज घेण्याकरीता बॅंकेशी संलग्न करेल. बेसलाइन सर्वेक्षण फलश्रूती संबंधी अभ्यास स्वयम सहाय्यता गटाची निर्मिती आणि प्रशिक्षण इत्यादि एकमूस्त आर्थिक सहाय्य प्रति समूह रुपये १.२५ लाख राहील. ज्या ठिकाणी राज्य शासन अंमलबजावणी यंत्रणा म्हणून बेसलाइन सर्वेक्षण फलश्रूती संबधी अभ्यास स्वयंम सहाय्यता गटाची निर्मिती इ. कार्य करेल तेव्हा राज्य शासनाच्या अंमलबजावणी यंत्रणेला हे अर्थसहाय्य अनुज्ञेय राहणार नाही.

(क.३.२) कन्सोर्टिसमवी निर्मिती

कन्सोर्टियम स्वयंम सहाय्यता गटाची (एस.एच.जी) सहकारी संस्था विणकर, खाजगी उद्योग बिनसरकारी संघटना इ. स्टेट होल्डर्स म्हणून समाविष्ठ राहील. ज्यांना विणकरासोबत विचार-विनिमय करण्याची आवश्यकता राहील आणि त्यांना संबंधीत संघटना जसे बॅंक/वित्तीय संस्था, विपणन संस्था/विपणन विशेषज्ञ, विपणनकर्ता कायदेशिर विशेषज्ञ, शासकिय कार्यालय विणकर इ. सोबत संपर्क साधावा लागेल. प्रति समूह या करीता रुपये ५०,०००/- एकमूस्त अर्थसहाय्य देण्यात येईल. त्यात बैठकाचे आयोजन स्टेशनरी खर्च विविध ठिकाणी दौरा, बाजार व जागरुकता, प्रशिक्षण चा समावेश करणे करीता कायदेशिर विशेषज्ञ व बाजाराचा विकास करण्याकरीता मान्यवर विशेषज्ञ इ. वर होणारा खर्च या तरतूदीमधून केल्या जाईल. ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत अनुदानच्या स्वरुपात एका समूहाला फक्त एक वेळाच दिल्या जाईल. कन्सोर्टियम समूहाचे कामकाज तिस-या वर्षी आपल्या हातात घेईल व त्यानंतर स्वबळावर याला चालवेल.

(क.३.३) सूत भंडाराची स्थापना करण्याकरीता कॉरपस निधी

सध्या विणकर/संस्था याना सूताची खरेदी करण्याकरीता एन.एच.डी.सी. अग्रीम स्वरुपात सूताची किंमत अदा करावी लागते व एन.एच.डी.सी. व्दारा सूत ३ ते ४आठवडयानंतर उपलब्ध करुन दिल्या जाते. त्यामूळे उत्पादन प्रक्रियामध्ये विलंब होतो. ३०० ते ५०० विणकराकरीता आवश्यक असलेल्या सव सूताची आवश्यकता विचारात घेवून ते सूनियोजीत पध्दतीने उपलब्ध करुन घेण्याकरीता रु. ३.०० लाख एकमूस्त आर्थिक सहाय्य एन.एच.डी.सी. ला कार्पोरस निधीच्या रुपात उपलब्ध करुन दिल्या जाईल की त्यामूळे एन.एच.डी.सी. स्वतःच्या यार्न भंडारमध्ये सूताची उपलब्धता सूनिश्चित करेल व त्यानंतर सूताची जशी जशी मागणी येईल तसा तसा पूरवठा केल्या जाईल.

(क.३.४)डिझाईनचा विकास करुन उत्पादनात विविधता आणणे

संगणक सहाय्यीत कापड डिझाईन (सी.ए.टी.डी.) प्रणालीची खरेदी, रंग पूर्वानुमान रंग संगती पूर्वानूमाण आणि इतर आवश्यकता करीता रुपये ३.०० लाख एकमूस्त अर्थसहाय्य दिल्या जाईल. त्यात राज्य व केंद्र शासनाचा वाटा अर्धा अर्धा राहील तिन वर्षाच्या कालावधीकरीता एक सुयोग्य डिझाईनरची नियूक्ती करण्याकरीता रु. ६.०० लाखाची आर्थिक सहाय्याची मदत दिल्या जाईल. हा संपूर्ण खर्च केंद्र शासनाव्दारे केल्या जाईल.

(क.३.५)सार्वजनिक सुविधा केंद्र/डाय हाऊस

सार्वजनिक सुविधा केंद्राची स्थापना करण्याकरीता अर्थसहाय्य उपलब्ध करुन दिल्या जाईल ज्यात पाणी, शुध्दीकरण सयंत्र, दुषित पाणी शुध्दीकरण सयंत्र पुर्व व पश्चात प्रक्रिया गुणवत्ता नियंत्रण प्रयोगशाळा प्रदर्शन हॉल / सभाकक्ष सार्वजनिक

कामकाज कक्ष इ. चा समावेश असेल. तथापि आवश्यकता असल्यास सी.एफ.सी. च्या सहाय्याने डाय हाऊस सार्वजनिक भागीदारी मधून विकसीत करता येईल. तथापि त्यामध्ये अशी अट असेल की २० टक्के खर्च राज्य/व्यापारी/एजन्सी/कन्सोंटियम व्दारे केल्या जाईल आणि उर्वरित ८० टक्के रक्कम केंद्रिय अनुदानाच्या रुपात दिल्या जाईल. सध्याचे रंगनीगृहाचे विकासाकरीता लागणा-या सहाय्यतेवर सुध्दा विचार केल्या जावू शकेल, परंतू असे समजावून दिल्या जाईल की नविन रंगनीगृहच्या स्थापनेची आवश्यकता नाही.

सार्वजनिक सुविधा केंद्र/डाई हाऊसच्या स्थापनेकरीता एक योजना राज्य शासनामार्फत अंमलबजावणी यंत्रणाव्दारे सादर केल्या जाईल आणि त्याचे अनुमोदन त्याची आवश्यकता आणि शेजारचे क्षेत्रातील उपलब्ध सुविधावर विचार केल्यानंतर विकास आयुक्त (हातमाग) यांचे अध्यक्षतेखाली समितीव्दारे केल्या जाईल. सार्वजनिक सुविधा केंद्र/डाई हाऊसच्या स्थापनेकरीता एकूण सहाय्यता जास्तीत जास्त रुपये ३०.०० लाख असेल. डाई हाऊसची स्थापना आवश्यकतेनूसार फक्त मोठया समूहाव्दारे केली जाईल.

(क.३.६) प्रचार व विक्री

भारतात तसेच परदेशात हातमाग प्रदर्शन करणे तथा उत्कृष्ठ हातमाग कापडाच्या बाबतीत जागरुकता निर्माण करण्याकरीता विक्री करणा-या संस्था आर्थिक सहाय्याकरीता पात्र राहतील ज्यात प्रसिध्दी पुस्तका तयार करणे, कॅटलॉग, बाजारपेठेचे सर्वेक्षण खरेदी विक्री दाराची बैठक इतर समूहांना भेटी देवून त्यांचे अनुभवाचा अभ्यास जागरुकता इ. प्रयोजनाकरीता होणा-या खर्चाचा समावेश राहील. याकरीता अर्थसहाय्य केंद्र शासन, राज्य शासन, अंमलबजावणी यंत्रणा याचा वाटा ७५:२५ च्या स्वरुपात राहील. बाबनिहाय खर्चाचा तपशिल खालीलप्रमाणे राहील.

१. जाहिरात पुस्तकाची छपाई, कॅटलॉग इ. करीता ३ वर्षाच्या कालावधीत रुपये ५०,०००/- चे अर्थसहाय्य मिळेल ज्यात केंद्र शासन व राज्य शासनाचा वाटा ७५:२५ च्या स्वरुपात राहील.

२. ३ प्रदर्शनी/मेळावे चे आयोजन करणे अथवा त्यात भाग घेण्याकरीता ३ वर्षाच्या कालावधीत रुपये ६.०० लाख पर्यत अर्थसहाय्य पात्र राहील.ज्यात केंद्र व राज्य शासनाचा वाटा ७५:२५ च्या स्वरुपात राहील.

३. खरेदी-विक्रीदारोच्या ६ सभांचे आयोजन करणे किंवा त्यात भाग घेणे करीता ३ वर्षाच्या कालावधीत रुपये ३.०० लाखपर्यत अर्थसहाय्य देण्यात येईल. त्यात केंद्र व राज्य शासनाचा वाटा ७५:२५ च्या स्वरुपात राहील.

४. बाजाराचे सर्वेक्षण करणे , बाजाराचा कल प्राप्त करुन घेणे याकरीता रुपये १.०० लाख पर्यत अर्थसहाय्य देण्यात येईत त्यात केंद्र व राज्य शासनाचा वाटा ७५:२५ च्या स्वरुपात राहील.

५. विणकरांच्या इतर समूहाला गाठी-भेटी देवून, अभ्यास दौ-यात त्यांच्या अनुभवाची माहिती करुन घेणे याकरीता ३ वर्षाच्या कालावधीत रुपये ३.०० लाख अर्थसहाय्य देण्यात येईल. हे अर्थसहाय्य प्रति विणकर रुपये ३,०००/- प्रमाणे राहील.

६. रुपये २५,०००/- चे एकमूस्त अर्थसहाय्य समूहाची वेबसाईड तयार करुन प्रदर्शित करण्याकरीता देण्यात येईल. प्रचार व विक्री करीता जास्तीत जास्त अर्थसहाय्य एकूण योजना खर्चाच्या २० टक्केपेक्षा जास्त देण्यात येणार नाही.

(क.३.७) योजनेवर होणारा व्यवस्थापन खर्च

अंमलबजावणी यंत्रणेला ३ वर्षाचे कालावधीत रुपये २.४० लाख प्रति वर्ष प्रमाणे आर्थिक सहाय्य दिल्या जाईल. जर राज्य शासन अथवा त्यांचे संबंधीत कार्यालय हे अंमलबजावणी यंत्रणा असेल तर प्रति वर्ष फक्त रुपये २५,०००/- व्यवस्थापन खर्चापोटी दिल्या जाईल.

## ३०० ते ५०० हातमाग असलेल्या समूहाकरीता आर्थिक सहाय्याचे विवरण

| अ. क्र. | तपशिल | प्रति समूहकरीता वित्तीय सहाय्य | हिस्सा केंद्र शासन : राज्य : आईए/लाभार्थी |
|---|---|---|---|
| १ | बेसलाइन सवेक्षण, फलश्रूती संबंधी अभ्यास आणि स्वयंम सहाय्यता समूहाची स्थापना | रु. १२.५ लाख एक मुस्त | १०० टक्के केंद्र शासन |
| २ | कन्सोर्टियमाची स्थापना | रु. ५०,००० एक मूस्त | १०० टक्के केंद्र शासन |
| ३ | यार्न भांडाराकरीता कॉरपस निधी | रु. ३.०० लाख एक मुस्त | १०० टक्के केंद्र शासन |
| ४ | डिझाइन विकास व उत्पाद विविधीकरण | संगणकाचे सहाय्याव्दारे वस्त्र निर्माण केंद्र (सीएटीडी) ची खरेदी, रंग पूर्वानुमान, प्रवृत्ती पूर्वानुमानाकरीता रु. ३.०० लाख एक मुस्त | ५०:५० |
| | | ३ वर्षापर्यत रु. ६.०० लाख डिझानरची नियूक्तीकरीता | १०० टक्के केंद्र शासन |
| ५ | साझा सुविधा केंद्र/डाइ हाऊस (एकूण योजनेच्या जास्तीत जास्त ५० टक्के पर्यत) | रु. ३०.०० लाख एक मुस्त | सीएफसी १०० टक्के केंद्र शासन डाई हाऊस ८०:२० केंद्र शासनः राज्य/आईए/ कन्सोर्टिया व्दारे |
| ६ | प्रचार व विपणन ( एकूण योजनेच्या जास्तीत जास्त २० टक्के पर्यत | जाहिरात, पुस्तीका, कैटलॉग करीता ३ वर्षापर्यत रु. ५०,००० | ७५:२५ |
| | | यात्रा/प्रदर्शनी करीता करीता ३ वर्षापर्यत रु. ६.०० लाख | ७५:२५ |
| | | विक्रीच्या बैठकीकरीता ३ वर्षापर्यत रु. ३.०० लाख | ७५:२५ |
| | | बाजाराचे सर्वेक्षण/आसूचना करीता ३ वर्षापर्यत रु. १.०० लाख एक मुस्त | ७५:२५ |
| | | विणकरांच्या दराबाबत जागरुकता व अनुभवाचे दौ-याकरीता ३ वर्षापर्यत रु. ३.०० लाख प्रति विणकर रु. ३००० प्रमाणे | १०० टक्के केंद्र शासन |
| | | वेबसाइट बनविणे आणि त्याचे प्रदर्शन करण्याकरीता रु. २५,००० एक मुस्त | १०० टक्के केंद्र शासन |
| ७ | योजनेच्या व्यवस्थापनाकरीता खर्च | प्रत्येक वर्षाकरीता रु. २.४० लाख याप्रमाणे ३ वर्षाकरीता रु. ७.२० लाख | १०० टक्के केंद्र शासन |

**टिप**

१. ज्या ठिकाणी राज्य शासन अंमलबजावणी यंत्रणा आहे त्या ठिकाणी बेसलाइन सर्वेक्षण निष्कर्षासबंधी अभ्यास व स्वयंम सहाय्यता गटाची निर्मिती राज्य शासनाव्दारे केल्या जाईल. त्या प्रयोजनाकरीता कोणतीही आर्थिक सहाय्यता दिली जाणार नाही.

२. समूहामध्ये नियूक्त करण्यात येणा-या डिझाईनरला कमीत कमी ३ वर्षाचा अनुभव असाला पाहिजे, तो निप्ट/एनआयडी चा पदविका धारक असावा. जर इतर संस्थाव्दारा उत्तीर्ण डिझाइनरची नियूक्ती करावयाची असल्यास अशा नियूक्तीला विकास आयूक्त (हातमाग) नवी दिल्ली याची पूर्व संमती घ्यावी लागेल व त्यांच्या बायोडाटासह प्रस्ताव विकास आयूक्त कार्यालयाला पाठवावा लागेल. शक्यतो डिझाइनर हा समूहाच्या जवळचा अथवा त्या राज्याचा निवासी असावा.

३.	ज्या समूहामध्ये अंमलबजावणी यंत्रणा ही राज्य शासन अथवा त्यांचेशी निगडीत कार्यालय असेल तिथे प्रति समूह प्रति वर्ष व्यवस्थावन खर्च म्हणून रुपये २५,०००/- दिल्या जाईल.

(क.३.८) समूहात विखूरलेल्या विणकराकरीता अर्थसहाय्य

बेसिक इनपूट व कार्यशाळेच्या निर्मितीकरीता समूहात समाविष्ठ असलेल्या ३०० ते ५०० विणकरांना अर्थसहाय्य मिळेल. तथापि समूहाची एकत्रित अर्थसहाय्य पात्रता रुपये ६०.०० लाखाच्या जास्तीत जास्त २५ टक्के पर्यत मर्यादित राहील. बाबनिहाय तपशिल खालीलप्रमाणे आहे.

(क.३.८.१)	बेसिक इनपूट

क)	कार्यशाळाकरीता मार्जीन मनी

मार्जीन मनी ही स्वयंम सहाय्यता गट व संस्थांच्या विणकरांना प्रति विणकर रुपये ६००० प्रमाणे दिल्या जाईल. त्यात ७० टक्के वाटा केंद्र शासन, २० टक्के राज्य शासन व १० टक्के लाभार्थी/संस्था याचा राहील.

ख)	नविन माग खरेदी

नविन माग खरेदी करीता स्वयंम सहाय्यता गट व संस्थांच्या विणकरांना प्रति विणकर रुपये ४००० प्रमाणे दिल्या जाईल. त्यात ७० टक्के वाटा केंद्र शासन, २० टक्के राज्य शासन व १० टक्के लाभार्थी/संस्था याचा राहील.

ग)	डॉबी

डॉबीच्या खरेदीकरीता स्वयंम सहाय्यता गट व संस्थांच्या विणकरांना प्रति विणकर रुपये ४००० प्रमाणे दिल्या जाईल. त्यात ७० टक्के वाटा केंद्र शासन, २० टक्के राज्य शासन व १० टक्के लाभार्थी/संस्था याचा राहील.

घ)	जकार्ड

जकार्डच्या खरेदीकरीता स्वयंम सहाय्यता गट व संस्थांच्या विणकरांना प्रति विणकर रुपये ६००० प्रमाणे दिल्या जाईल. त्यात ७० टक्के वाटा केंद्र शासन, २० टक्के राज्य शासन व १० टक्के लाभार्थी/संस्था याचा राहील.

ड)	एक्सेसरीज

एक्सेसरीजच्या खरेदीकरीता स्वयंम सहाय्यता गट व संस्थांच्या विणकरांना प्रति विणकर रुपये २००० प्रमाणे दिल्या जाईल. त्यात ७० टक्के वाटा केंद्र शासन, २० टक्के राज्य शासन व १० टक्के लाभार्थी/संस्था याचा राहील.

टिप :-	पूर्वोत्तर राज्ये सिक्कीम, जम्मू व काश्मीर, हिमाचल प्रदेश, उत्तरांचल, छत्तिसगड आणि झारखंड मध्ये बेसिक इनपूट करीता केंद्र शासनाचा वाटा ९० टक्के, राज्य शासनाचा वाटा ५ टक्के व लाभार्थी/संस्थांचा वाटा ५ टक्के राहील. आर्थिक प्रस्तावांची शिफारस ही विणकरांच्या आवश्यकतेचे मुल्यांकन केल्यानंतरच केली जाईल. बेसिक इनपूटची आवश्यकता प्रपत्र क-२ मध्ये दर्शविण्यात आलेली आहे.

(क.३.८.२)	कार्यशाळेचे निर्माण

कार्यशाळेच्या निर्माणाकरीता अर्थसहाय्य खालीलप्रमाणे दिल्या जाईल.

| विवरण | प्रति कार्यशाळेचे क्षेत्रफळ | अर्थसहाय्याची रक्कम |
|---|---|---|
| कार्यशाळेची बांधणी करणे | २० वर्ग मिटर | रुपये २५,००० |

जिथे केंद्रिय अर्थसहाय्य पुरेशा प्रमाणात उपलब्ध असेल व कार्यशाळा बांधकामाचा खर्च जास्त होणार असेल त्या ठिकाणी राज्य शासन/केंद्रशासित प्रदेश/संस्था/लाभार्थी आपले स्वतःचे भांडवल अथवा वित्तीय संस्थाकडून कर्ज घेण्याची मुभा राहील.

उपरोक्त बाबीकरीता दारिद्र रेषेखालील विणकर (बी.पी.एल) यांना प्राधान्य देण्यात येईल.घर बांधणीकरीता विणकर ग्रामविकास मंत्रालयाच्या इंदिरा आवास योजना अंतर्गत अर्थसहाय्य प्राप्त करु शकते. दारिद्र रेषेखालील विणकरांना प्राथम दिल्यानंतर योजने अंतर्गत अर्थसहाय्य शिल्ल राहिल्यास इतर विणकरांना या योजनेचा लाभ देण्यात येईल. दारिद्र रेषेखालील विणकरांना रुपये २५,००० चे अर्थसहाय्य केंद्र शासनाव्दारा केंद्रिय वाटा म्हणून दिल्या जाईल व जे विणकर दारिद्र रेषेखालील

नाहीत अशा विणकरांना केंद्र वाटा ७५ टक्के म्हणजेच रुपये १८,७५० दिल्या जाईल उर्वरित रक्कम राज्य शासन/लाभार्थी यांना वहन करावा लागेल. अर्थसहाय्याकरीता जमीनीची मालकी विणकरांच्या नावावर आहे याबाबत एक प्रमाणपत्र द्यावे लागेल.

(क.३.८.३) कौशल्याची गुणवत्ता वाढविणे

वाढत्या बाजारातील मागणीला पूर्ण करण्याचे दृष्टीने उच्च गुणवत्ताधारक व कौशल्यपूर्ण उत्पादन करण्याकरीता विणकरांना प्रशिक्षण आणि पूर्ण प्रशिक्षण एक महत्वपूर्ण इनपूट आहे. या योजने अंतर्गत हातमाग विणकर कामगार यांना तांत्रिक आणि व्यवस्थापन कौशल्यात निपूणता आणून देण्याचा दृटीकोन आहे. २० प्रशिक्षणार्थीच्या प्रत्येक गटाकरीता अर्थसहाय्य खालीलप्रमाणे राहील. हे अर्थसहाय्य १०० टक्के केंद्र पुरस्कृत राहील.

(क) विणकाम - प्रति बॅच रुपये ३.०० लाख

(ख) डाई -- प्रति बॅच रुपये १.०० लाख

(ग) डिझाईन -- प्रति बॅच रुपये ०.५० लाख

(घ) एस.एच.जी./ प्राथमिक विणकर सहकारी संस्था /कर्न्सोटियम च्या व्यवस्थापकीय कर्मचा-यांच्या प्रशिक्षणाकरीता प्रति बॅच रुपये ०.२५ लाख ( ५० प्रशिक्षणार्थी )कौशल्य नूपूणतेबाबत दिशानिर्देश परिशिष्टात नमूद करण्यात आले आहेत. कौशल्य निपूणतेकरीता जास्तीत जास्त अर्थसहाय्य एकूण योजना खर्चाच्या १५ टक्केपेक्षा जास्त असणार नाही. विणकरांची कौशल्य निपूणतेची अंमलबजावणी, अंमलबजावणी यंत्रणेव्दारा केली जाईल.

३०० ते ५०० हातमाग असलेल्या समूहाकरीता आर्थिक सहाय्याचे विवरण

| अ. क्र | तपशिल | प्रति समूहाकरीता अर्थसहाय्य | हिस्सा केंद्र सरकारः राज्य सरकार आई ए लाभार्थी |
|---|---|---|---|
| (क) | बेसिक इनपूटस | मार्जीन मनीकरीता रु. ६०००/- एकमुस्त<br>नविन हातमागाकरीता रु. ८,०००/- एकमुस्त<br>डॉबीकरीता रु. ४०००/- एकमुस्त<br>जेकॉर्ड करीता रु. ६०००/- एकमूस्त<br>एक्सेसरीज करीता रु. २,०००/- एकमुस्त | ७०:२०:१०<br>७०:२०:१०<br>७०:२०:१०<br>७०:२०:१०<br>७०:२०:१० |
| (ख) | कार्यशाळेचे निर्माण | २० वर्ग मिटरच्या कार्यशाळेकरीता रु. २५,०००/- पर्यंत वित्तीय सहायता केंद्र शासनाव्दारे दारिद्र रेषेखालील विणकरांना दिल्या जाईल आणि उर्वरित विणकरांच्या बाबतीत केंद्र शासन फक्त रुपये २५,०००/- म्हणजेच रु. ७५ टक्के रु. १८,७५०/- | उर्वरित रक्कम राज्य शासन/ लाभार्थीव्दारे वहन केल्या जाईल. |
| (ग) | कौशल निर्माण (एकूण योजनेच्या जास्तीत जास्त १५ टक्के) | २० प्रशिक्षणाच्या तूकडीकरीता खालीलप्रमाणे सहाय्य<br>हातमागाकरीता रु. ३.०० लाख<br>डाईग करीता रु. १.०० लाख<br>डिजाइनिंग करीता रु. ०.५० लाख<br>५० प्रशिक्षणाच्या तुकडीलकरीता व्यवस्थापन प्रशिक्षणाकरीता रु. ०.२५ लाख एकमुस्त | १०० टक्के केंद्र शासन |

टिप : अनुक्रमाक (क) आणि (ख) मध्ये दिलेल्या बाबीचे अर्थसहाय्य सबंधीत राज्य शासनामार्फत अंमलबजावणी यंत्रणेला अदा केल्या जाईल.

(क.४) वित्तीय सहाय्याचे परिमाण

वित्तीय सहाय्याची आवश्यकता ही गरजेनूसार असली पाहिजे. समूहाची जी आवश्यकता असेल तसेच समूह विकास योजनेमध्ये ज्या बाबींचा विस्तार करावयाचा असेल तांत्रिक आणि आर्थिक व प्रशासनीक क्षमता परिपक्ताचा दर्जा आणि समूहाचे निष्कर्ष इ. वर आधारित राहील. प्रत्येक समूहाकरीता तिन वर्षाच्या कालावधीत रुपये ६०.०० लाखपेक्षा जास्त खर्च होणार आहे आणि त्यात केंद्र, राज्य आणि अंमलबजावणी यंत्रणा/लाभार्थी यांचा वाटा राहील

(क.५) राज्यस्तरीय प्रकल्प समिती (एस.एल.पी.सी.)

राज्यस्तरीय प्रकल्प समितीचे अध्यक्ष आयूक्त हातमाग/संचालक, वस्त्रोद्योग राहील. समितीत निमसरकारी संघटना, हातमाग संघटना ( केंद्रिय हातमाग संस्था/राज्य हातमाग महामंडळ) निर्यातदार, विणकर सेवा केंद्राचे अधिकारी आणि एच.एस.जी. च्या विणकरांचे प्रतिनिधीचा समावेश असेल. एस.एल.पी.सी योजने अंतर्गत प्रस्तावाची छाननी करणे, योजनेच्या अंमलबजावणीकरीता निर्धारित केलेल्या कार्यक्रमाची वैधता तपासणे, योजनेवर देखरेख ठेवणे, योजनेचे मुल्यांकन करणे इ. कामाकरीता जबाबदार राहील. तसेच अंमलबजावणी यंत्रणेचीही शिफारस करेल.

(क.६) अंमलबजावणी यंत्रणा

राज्स शासन/केंद्र शासन, अंमलबजावणी यंत्रणा म्हणजे राज्य शासनाचे कार्यालय जसे हातमाग संचालनालयाचे संबंधीत कार्यालय, राज्य हातमाग महामंडळ, केंद्रिय सहकारी संस्था, निमसरकारी संघटना (राज्य शासनाव्दारे केलेली शिफारस आणि हातमाग विकास आयूक्त कार्यालयाव्दारा अनुमोदीत) कडून प्रस्ताव प्राप्त करुन घेईल. अंमलबजावणी यंत्रणा (आय.ए.) हातमाग व वस्त्रोद्योग संचालक तसेच राज्य शासनाचे संबंधीत कार्यालय, राज्य हातमाग महामंडळ, केंद्रिय सहकारी संस्था, संघटना, राज्य शासनाव्दारे केलेली शिफारस आणि हातमाग विकास आयूक्त कार्यालयाव्दारे अनुमोदीत निमसरकारी सघटना, राष्ट्रीय स्तरावरील हातमाग संघटना आणि केंद्र शासनाच्या संघटना, सेवाभावी संस्थाच्या श्रेणीकरीता प्रपत्र क-४ आहे. १०० पैकी ६० गुण प्राप्त करणा-या सेवाभावी संस्थांच्या बाबतीत विचार केल्या जाईल. अंमलबजावणी यंत्रणेची कर्तव्ये खालीलप्रमाणे आहेत.

१. समूह विकास कार्यकारी अधिकारी (सीडीई) ची निवड करणे.
२. सी.डी.ई. च्या प्रशिक्षणाकरीता राज्य शासन/राज्यस्तरीय अंमलबजावणी समिती सोबत चर्चा करणे.
३. बेसलाइन सर्वेक्षण आणि फलश्रूती बाबत अभ्यास करणे.
४. सी.डी.ई. व्दारा फलश्रूती संबंधी केलेल्या अभ्यासाचे आधारावर एक योजना तयार करणे ज्यात इतर बाबीसोबतच वार्षिक कार्यक्रमाचा उल्लेख करणे आणि समूहाची आवश्यकता, करावयाची कार्यवाही आणि उत्पादन, योग्य उत्पादन कार्यक्रमाचा व उत्पादित प्रमाणाचा त्यात स्पष्ट उल्लेख असावा. हा प्रस्ताव एस.एल.पी.सी. समोर सादर करणे त्यांची अनुमती घ्यावी लागेल.
५. वर उल्लेखित केलेले सर्व बाबी विहीत कालमर्यादित अंमलबजावणी करणे
६. कामकाज व आर्थिक प्रगती अहवाल तसेच पूर्णतः अहवाल वेळोवेळी राज्य शासनाला सादर करावा लागेल.

(क.७) समूह विकास योजनेचा कालावधी

समूह विकास योजनाचा कालावधी हा पूर्णतः ३ वर्षाकरीता आहे.

(क.८) प्रस्ताव सादर करणे व आर्थिक सहाय्यतेचे रिलीज

(क.८.१) बेस लाइन सर्वेक्षण आणि फलश्रूती संबंधीच्या अभ्यासाकरीता प्रथम प्रस्ताव प्रत्येक समूहाचा विकास हा योजनेच्या विकासाचे रुपात केंद्रिय स्वरुपात योजनेच्या निकशाप्रमाणे परिपूर्ण प्रस्ताव संस्थेने जिल्हा उपनिबंधक यांचेकडे सादर करावा. जिल्हा उपनिबंधक, प्रादेशिक उपसंचालक यांना प्रस्ताव सादर करतील. प्रादेशिक उपसंचालक शिफारशीसह संचालनालयास प्रस्ताव सादर करतील. राज्य प्रकल्प समितीच्या मान्यतेने सदर प्रस्ताव संचालनालय केंद्र शासनास सादर करतील.

## ९) राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजने अंतर्गत यंत्रमाग सहकारी संस्थांना अर्थसहाय्य

यंत्रमाग सहकारी संस्थांना राष्ट्रीय सहका-२००९ अन्वये सुरु करण्यात आलेली आहे. सदर योजनेखाली माग खरेदी अथवा लुम्स वर्कशेडचे बांधकाम/आधुनिकीकरण/नुतनीकरण/ बांधकाम/ गोदाम उघडणे/ शोरुम/ मार्केटिंग कॉम्प्लेक्स/ सहकारी वस्त्रोद्योग इस्टेट व मागावर येण्या आधीची व नंतरची प्रक्रिया/निटींग/तयार कपडे/शिलाई केंद्रे इ. प्रकल्पाच्या उभारणीकरीता राज्य शासनाकडून ४० टक्के भाग भांडवल व ५० टक्के कर्ज उपलब्ध करुन दिल्या जाते. तसेच १० टक्के रक्कम लाभार्थी सस्थेचा सभासदाकडून गोळा करण्यात येते.

मार्जीन मनी करीता १०० टक्के अर्थसहाय्य उपलब्ध करुन दिल्या जाते. त्यामध्ये ५० टक्के शासकिय भागभांडवल व ५० टक्के कर्जाचा समावेश असतो.

सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० या कायद्याखाली नोंदणी झालेली यंत्रमाग/निटींग/गारमेंट/प्रोसेसर्स/सायझिंग सहकारी संस्थां अर्थसहाय्य मागणीचा परिपूर्ण प्रस्ताव संबंधीत प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग (सोलापूर/नागपूर/मुंबई/औरंगाबाद) यांचेमार्फत संचालनालय, वस्त्रोद्योग, महाराष्ट्र शासन, नागपूर यांचेकडे सादर करण्यात येते. तदनंतर पुढील कार्यवाहीसाठी सदरचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात येतो आणि शासनामार्फत अंतिम मंजूरीसाठी सदरचा प्रस्ताव राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना सादर करण्यात येते.

राष्ट्रीय सहकारी विकास निगम यांनी प्रस्तावास मंजूरी दिल्यानंतर राज्य शासनामार्फत लाभार्थी संस्थेला अर्थसहाय्य उपलब्ध करुन दिल्या जाते.

## १०) अनुसूचित जाती व नवबौध्दांना सहकारी सूत गिरण्यांचे भाग खरेदीसाठी अनुदान.

दारिद्र्य रेषेखालील मागासवर्गीय व विशेष घटक योजने अंतर्गत मागासवर्गीय सभासदांना सहकारी सूतगिरण्यांचे भाग खरेदीसाठी ९० टक्के इतके अर्थासहाय्य/ अनुदान मंजुर करण्यात येउन उर्वरित १० टक्के भाग सभासदांनी स्वताः भरावयाचा आहे. सहकारी सूतगिरण्यांचे शेअर्स बाबत रु १८०० ईतके अर्थसहाय्य मंजुर करण्यात येते व रु २०० इतकी त्या सभासदांची स्वताःची वर्गणी जमा असावी व ती त्यानी स्वताः भरावी. सभासदांचा भाग रक्कम रु २००० पुर्ण झाल्यानंतर व जवळपास ५ टक्के इतके भागभांडवल जमा केल्यानंतर त्याचे १:९ प्रमाणात शासकीय भाग मंजुर करण्यात येते. शासकीय भाग भांडवल वितरित झालेल्या गिरण्या योग्य त्या प्रमाणात शासनाकडुन कर्ज घेण्यास पात्र ठरविण्यात येते.

मागसवर्गीयांच्या अनुसूचित जातीच्या सहकारी सूत गिरण्यांना प्रकल्पाच्या किमतीचे ५ टक्के आणि कमितकमी रु ८०.०० लाखापर्यंत सभासद भाग भांडवल गोळा केल्यास सदर गिरणी कर्जाकरिता पात्र समजण्यात येते. शासनाकडुन जे दीर्घ मुदती कर्ज दिल्या जाईल त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावयाचे आहे. कर्जाचे रकमेचा विनियोग योग्य प्रकारे न झाल्यास दिलेली रक्कम महसुली थकबाकी म्हणुन वसुल करण्यात येईल. सहकारी सूत गिरण्यांना जे स्वताःचे भाग भांग भांडवल आणि शासकीय भाग भांडवल जेवढे उभारले असेल त्याचा १:१ प्रमाणात दीर्घ मुदतीचे कर्ज मंजुर करण्यात येते.

मागसवर्गीय व विशेष घटक योजने अंतर्गत असणा-या सूतगिरण्यांना शासनाने वित्त विभागाकडुन ठरवुन दिल्यानुसार व्याजाची आकारणी करण्यात येते.

## ११) राज्यातील सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भाग भांडवल मंजुरी देण्याची योजना ..

राज्यात सहकारी क्षेत्रात एकुण १२१ सहकारी सूतगिरण्या आहेत. सूतगिरण्यांची उभारणीकरिता सूतगिरण्यांनी सभासदांकडुन गोळा केलेल्या भागभांडवलाची ९ पट रक्कम प्रकल्प किमतीच्या ४५ टक्के रकमेच्या अधिन राहून मंजुर करण्याची राज्य शासनाची योजना आहे. सध्या आठव्या व दहाव्या पंचवार्षिक योजनेतील एकुण ६३ सहकारी सूतगिरण्यांना अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यात येत आहे. आठव्या व दहाव्या पंचवार्षिक योजनेतील सहकारी सूतगिरण्यांना रु. ८९९.८७ कोटी इतकी रक्कम शासकीय भांडवल म्हणुन उपलब्ध करुन देण्यात आली आहे व उर्वरित रक्कम जी सुमारे ५००.०० कोटी होते ती उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही सुरु आहे.

सुतगिरणीच्या एका प्रकल्पाची अधिकतम किंमत शासन निर्णय दि. ०२.०८.२००३ अन्वये रु ५३ कोटी ठरविण्यात आली आहे. सदर किमतीची ५ टक्के रक्कम सूतगिरण्यांनी सभासदांकडुन गोळा करावयाची असून प्रकल्प किमतीची ४५ टक्के रक्कम राज्य शासनाकडुन शासकीय भाग भांडवल म्हणुन उपलब्ध करुन देण्यात येते. तसेच प्रकल्प किमतीची ५० टक्के रक्कम सहकारी सूतगिरण्यांनी वित्तीय संस्थांकडुन उपलब्ध करुन घ्यावयाची आहे.

राज्यात अर्थसहाय्याकरिता निवडलेल्या १२१ सहकारी सूतगिरण्यांपैकी ३० सहकारी सूतगिरण्या उत्पादनात आहेत. ३२ सूतगिरण्या अंशतः उत्पादनात आहेत. तसेच २५ सूतगिरण्या उभारणीखाली, २८ सूतगिरण्या अवसायनात, ६ सूतगिरण्या बंद आहेत.

## १२) सुतगिरण्यांचे आधुनिकीकरण, विस्तारीकरण व पुनर्वसनासाठी अर्थसहाय्य ..

### अ) आधुनिकीकरण/ विस्तारीकरण :

राष्ट्रीय सहकारी विकास निगमाचे योजनेच्या उद्देश राज्यातील स्थापित सहकारी सूत गिरण्यांच्या आर्थिक व तांत्रिक सुधारणा आणण्यासाठी गिरणी ७ वर्षापासुन उत्पादनाखाली असणे आवश्यक आहे. निगमाचे अर्थसहाय्य गरजेनुसार व टप्प्याटप्प्याने उपलब्ध करुन देण्यात येते. अर्थसहाय्य गिरणीची आर्थिक स्थिती, कामकाज, गिरणीची पुर्वपिठीका, घेतलेल्या कर्जाची परतफेड याबाबतचा अभिलेख या बाबी विचारात घेउन अर्थसहाय्य करण्यात येते. त्याकरिता गिरणीने आधुनिकीकरणासाठी आवश्यक प्रकल्प अहवाल तयार करुन सादर करणे तसेच कापुस उत्पादकांच्या गिरण्यांसाठी गिरणीच्या एन.डी.आर. पाझिटीव्ह असण्याची आवश्यकता नाही. मात्र ईतर गिरण्यांचे बाबतीत एन.डी.आर. पाझिटीव्ह असणे आवश्यक आहे. मात्र ईतर गिरण्यांचे बाबतीत एन.डी.आर. पाझिटीव्ह असणे आवश्यक आहे. आधुनिकीकरण विस्तारीकरण करण्यासाठी मुदती कर्जे (कापुस उत्पादकांच्या गिरण्यांसाठी मुदतीकर्जे ६० टक्के, राष्ट्रीय सहकारी विकास निगम मार्फत द्यावयाचे गुंतवणुक कर्जे ३० टक्के व सभासदांच्या समभाग १० टक्के असणे गरजेचे आहे. तसेच हातमाग विणकरांच्या गिरण्यांसाठी रा.स.वि.नि. मार्फत राज्य शासन कर्ज ९० टक्के पर्यंत व शासना मार्फत कर्ज स्वरुपात ८० टक्के तसेच शासनामार्फत गिरणीस भागभांडवल २० टक्के यामध्ये शासनाच्या साधन सामग्रीमधुन १० टक्के उपलब्ध करुन देण्यात येते.

### ब) विस्तारीकरण :

कापुस उत्पादकांच्या काही निवडक गिरण्यांना त्यांच्या उत्पादित केलेल्या मालाला चांगला भाव मिळावा या दृष्टीकोनातुन विस्तारीकरण योजनेखाली अर्थसहाय्य करण्यात येते. या अंतर्गत आधुनिकीकरण करण्यासाठी असलेल्या अटी व शर्ती लागु आहेत.

### क) पुनर्वसन :

या योजने अंतर्गत जुन्या गिरण्यांना म्हणजेच १० वर्षापुर्वीच्या गिरण्यांना पुनर्वसन कर्ज देतांना आधुनिकीकरणाचा विचार करण्यात येईल. तथापि १० वर्षापेक्षा कमी कालावधीतील गिरण्यांच्या बाबत पुनर्वसनासाठी अर्थसहाय्याचा विचार करण्यात येतो. सदर योजने अंतर्गत गिरण्यांना अर्थसहाय्य पॅकेज स्वरुपात देण्यात येते. राष्ट्रीय सहकारी विकास निगमच्या अटीच्या अधिनतेने कापूस उत्पादकांच्या सहकारी सूतगिरण्यांना या योजने अंतर्गत लाभ देता येतो. ईतर गिरण्यांना या योजनेच्या लाभ घेण्यासाठी त्यांचा नेटवर्थ पाझिटीव्ह असणे गरजेचे आहे. त्यासाठी अशा प्रकारच्या गिरण्यांनी घेतलेल्या मुदती कर्जाचे रुपांतर शासनाने भाग भांडवलात करुन गिरण्यांच्या नेटवर्थ पाझिटीव्ह केल्यास या योजने अंतर्गत त्या गिरण्यांना लाभ घेता येईल.

| अ. क्र. | विभागाकडुन/ कार्यालयाकडुन पुरविली जाणारी सेवा | आवश्यक कागदपत्राची पुर्तता केल्यानंतर किती कालावधीत सेवा पुरविली जाईल | सेवा पुरविणारा अधिकारी/ कर्मचारी | सेवा विहीत कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल तो अधिकारी व त्याचा दुरध्वनी क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | हातमाग कापडाच्या उत्कृष्ठ नमुन्यासाठी बक्षीसे. | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| २. | हातमाग खरेदी/ आधुनिकीकरण/ नुतनीकरण या करिता अर्थसहाय्य. | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| ३. | तांत्रिक उच्च शिक्षण | २ ते ४ महिने | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| ४. | जाहिराती व प्रसिध्दी योजना | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| ५. | आरोग्य विमा योजना | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| ६. | महात्मा गांधी विणकर विमा योजना | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| ७. | गिरणीचे ठिकाणावरील दराने सूत पुरवठा (मिल गेट प्राईस योजना) | सुताच्या उपलब्धतेवर कालावधी अवलंबुन | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| ८. | मध्यवर्ती वित्तीय संस्थांना व्याज अनुदान | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| ९. | हातमाग संस्थांचे थकीत कर्जापैकी ५० टक्के कर्ज राज्य शासनाने भरण्याबाबत. | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| १०. | एकात्मिक हातमाग विकास योजना (आय.एच.डी.एस.) | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| ११. | राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजने अंतर्गत यंत्रमाग सहकारी संस्थांना अर्थसहाय्य | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| १२. | अनुसूचित जाती व नवबौध्दाना सहकारी सूत गिरण्यांचे भाग खरेदीसाठी अनुदान. | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| १३. | राज्यातील सहकारी सुत गिरण्यांना शासकीय भाग भांडवल मंजुरी देण्याची योजना | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |
| १४. | सहकारी सुत गिरण्यांचे आधुनिकीकरण, विस्तारीकरण व पुनवर्सनासाठी अर्थसहाय्य. | १ आर्थिक वर्ष | संचालक वस्त्रोद्योग महाराष्ट्र शासन नागपुर | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) |

